८. विटे प्रतींत ८७४ ओव्या अधिक आहेत. त्या आल्या कशा ? मूळ ज्ञानेश्वरींत त्या असत्या तर पुढील नकलांतून ५।२ ; ओव्या गळण्याची शक्यता; परंतु एकदम ७।८ शें ओव्या गळणें अशक्य. मूळ प्रतीचें पारायण करणारास स्फूर्ति होऊन त्यानें मधून मधून या ओव्या घातल्या असाव्या. या दृष्टीनें याहि ओव्या अभ्यसनीय आहेत.

---

# ४ संत कबीरांच्या भाषेवर मराठी भाषेचा प्रभाव

( डॉ. का. शं. केळकर, एम्. ए., पीएच. डी., पुणें )

संत कबीरांच्या रचनेंत सांपडणारी भाषा आणि तिचें विवेचन करतांना कबीरांच्या विविध रचना, त्यांचा काल, त्यांचे विषय आणि त्यांची प्रामाणिकता इ.चा विचार करणें आवश्यक असूनही तो टाळण्याचा प्रयत्न केला आहे. प्रस्तुत निबंधांत फक्त कबीरांच्या भाषेसंबंधीच्या मुद्यांचें विवेचन केलें आहे.

कबीरांच्या नांवावर प्रसिद्ध झालेल्या आणि होणाऱ्या अनेक रचना आहेत. कबीरांची हस्तलिखित अशी रचना मूळ रूपांत सांपडली असती तर तिच्या मूळ भाषेचा विचार निश्चित रूपांत आणि ठामपणें करतां आला असता, परंतु त्याचीच वाण असल्यानें कबीरांच्या रचनेंतील भाषेचें रूप काय होतें याबद्दल प्रश्न निर्माण होतो.

प्रस्तुत निबंधाचा आधार–ग्रंथ "कबीर–ग्रंथावली"[1] हा आहे. याही ग्रंथाबद्दल टीकाकारांचें एकमत नाही. परंतु कबीराचें अध्ययन करणाऱ्यांनीं याच ग्रंथाला आधारभूत मानलें आहे आणि या ग्रंथांत "कबीरांच्या हस्तलिखित प्रतींत व ग्रंथ – साहब यांत सांपडणाऱ्या भाषेचें रूप शक्य तोवर जसेंच्या तसें ठेवण्यांत आले आहे"[2] असा संपादकांचा दावा आहे. म्हणूनच या ग्रंथाचा आधार घेतला आहे.

कबीरांचें अध्ययन आणि संशोधन करणाऱ्या विद्वानांनीं कबीरांच्या भाषेसंबंधीं केलेलीं निरनिराळीं विधानें पाहूं.

(१) भाषेसंबंधीं कबीराचें स्वतःचें म्हणणें आहे– "बोली हमरी पूरबकी"[3]

(२) कबीर–बीजक ग्रंथांतील भाषेच्या संबंधानें खालील विधान केलें गेलें आहे. "वह बनारस मिर्जापुर तथा गोरखपुर के आसपासकी बोली है। इसकी भाषा ठेठ प्राचीन पूर्वी है।"[4]

---

(१) कबीर–ग्रंथावली, संपादक : श्यामसुंदरदास छठवाँ संस्करण संवत् २०१३. (२) कबीर ग्रंथावली भूमिका पृ. ६. (३) कबीर साहित्य की परख–आचार्य परशुराम चतुर्वेदी द्वितीय संस्करण संवत् २०२१ पृ. ८१. (४) कबीर साहब का बीजक, कबीर ग्रंथप्रकाशन समिति पृ. १९०.

( ३ ) डॉ. बाबूराम सक्सेना कबीरांना 'अवधीका प्रथम संतकवि'[५] मानतात.

( ४ ) श्री सूर्यकिरण पारिख यांच्या मतें "कबीर की भाषा राजस्थानी है एवं कबीर को राजस्थानी का कवि कहा जा सकता है"[६].

( ५ ) डॉ श्यामसुंदरदास लिहितात "कबीरदासजी की भाषामें पंजाबीपन बहुत मिलता है।"[७]

( ६ ) डॉ. सुनीतिकुमार चतर्जी कबीरांचे भाषेबद्दल आपलें मत असें देतात "वह हिन्दी ( हिन्दुस्थानी ) तथा ब्रजभाषा का एक मिश्रित रूप है।"[८]

वरील सर्व कथनांचें सार असें की 'कबीरांच्या भाषेंत राजस्थानी, ब्रज, पंजाबी, अवधी, खडी बोली आदि भाषांतील रूपांचा प्रयोग सांपडतो. म्हणूनच असें म्हटलें जातें कीं, कबीरांच्या भाषेवर अनेक भाषांचा प्रभाव दिसून येतो; अथवा विभिन्न भाषा आणि बोली यांचीं वैशिष्ट्यें कबीरांनीं वापरलेल्या भाषेंत दिसून येतात. पण हा प्रभाव कसा पडला याचा ऊहापोह फारच कमी केला गेला आहे.

अनेक भाषांच्या प्रभावांनीं युक्त असणाऱ्या कबीरांच्या भाषेबद्दल एक असाहि तर्क देणेंत येतो, 'कबीरांच्या भाषेचें नीट परीक्षण केलें असतां असें दिसून येतें की त्या भाषेंत कृत्रिमपणा नसून स्थैर्य आहे. त्या काळीं अशीच भाषा बिहारपासून गुजरातपर्यंत व पंजाब पासून दक्षिणेपर्यंत बोलली जात असे. कबीरांनीं याच भाषेचा आधार घेऊन आपल्या मतांचा प्रचार केला.'[९] याच संदर्भात दुसरा एक तर्क असा 'कबीरसाहेबांच्या पूर्वीं असणाऱ्या प्रचलित भाषेचा वापर अनेक संतांनीं केला....संत नामदेव आणि कृष्णमुनी यांनीं आपल्या मतांचा प्रचार उत्तरेकडे पंजाब प्रान्तापर्यंत केला आणि आपले उपदेश हिन्दी भाषेंत केले."[१०]

वरील विवेचनाच्या आधारें असें म्हणतां येईल कीं जर कबीरांच्या भाषेवर अन्यान्य भाषांचा प्रभाव असेल तर तसा प्रभाव मराठीचाही असूं शकेल असें म्हणण्यास हरकत नाहीं. हा प्रभाव दाखवण्याचा प्रयत्न करतांना दिलेलीं उदाहरणें नमुन्यासाठींच दिलेलीं आहेत.

( १ ) कित्येक हिन्दी शब्दांत प्रथम स्वर ऱ्हस्व आहे. मराठीतील त्याच अर्थानें वापरलेल्या शब्दांत मात्र तो दीर्घ आहे. उदा. हिन्दी रखना, सरिखा, अंधा, भंडा, लकडी, हड्डी, इ मराठी राखणें, सारिखा, आंधळा, भांडे, लाकडी, हाड इ.

वरील शब्दरूपांवरून हे मराठी प्रभावयुक्त शब्द असावेत असा तर्क आहे.

---

( ५ ) दक्खिनी हिन्दी प्र. संस्करण इ. १९५२ पृ. ३२. ( ६ ) कबीर साहित्य की परख पृ. २०५. ( ७ ) कबीर ग्रंथावली. पृ. ? ( ८ ) भारतीय आर्यभाषा और हिन्दी पृ. १९८. ( ९ ) कबीर साहित्य और सिद्धान्त पृ. ३८. ( १० ) कबीर साहित्य की परख पृ. २१६

( २ ) कबीरांनीं वापरलेल्या शब्दांत अशीं अनेक नामें आहेत जीं मराठीत ज्या अर्थानीं वापरली जातात त्याच अर्थांनीं कबीरांनीं वापरलेलीं आहेत. या शब्दांचे हिन्दी अर्थ मात्र वेगळे आहेत. उदा. ( अ ) **खोंडिः** राम नाम जाण्यौ नहीं, लागी मोटी खोडि ।[११] खोडी शब्दाचा मराठी अर्थ वाईट सवय, अवगुण, दोष इ. आहे. हिन्दीत या शब्दाचा अर्थ भूत, प्रेत इ. ची बाधा असा आहे.[१२] कबीरांनीं खोडि हा शब्द वाईट सवय या मराठी अर्थानेंच वापरला आहे. ( आ ) दुसरा शब्द **घाणः** तन-मन कीया घाण ।[१३] घाण शब्द संक्षिप्त हिन्दी शब्दकोषांत नाहीं. कबीर ग्रंथावली सटीक[१४] या पुस्तकांत घाण याचा अर्थ नाहींसें केलें असा दिला आहे. कबीरांनीं वापरलेला घाण हा शब्द मराठींत प्राचीन काळापासून चालत आला आहे त्याचा अर्थ दुर्गंधियुक्त, अपवित्र कुरूप इ. असा आहे आणि याच अर्थानें कबीरांनीं तो शब्द वापरला आहे.

( ३ ) कांहीं विशेषणें:– बापुडा, बापुडे

बापुडा– ' ते क्यूं छुटैं **बापुडे** बाँधे सिरजनहार ।[१५]

बापुडा शब्द हिन्दींत नाहीं. त्याच्या निकटवर्ती रूपांत सांपडणारा शब्द बपुरा आहे. पण बपुरा शब्द प्रान्तीय प्रयोग असल्याचें कोशांत नमूद आहे. हा कोणत्या प्रांतांतील भाषेचा प्रयोग आहे या प्रश्नाचें उत्तर देताना मराठीकडेच बोट दाखवावें लागेल.

( ४ ) क्रियाविशेषणः– ऊभा, ऊभी;

सबही ऊभा मेल्हिगया रावरंक सुलितान ।[१६] यांतील ऊभ, ऊभा शब्द हिन्दी कोषकारांच्या मतें प्राचीन हिन्दी अथवा फक्त पद्यांत वापरण्यांत येतो. मराठींत हा शब्द गद्यपद्यांत सर्वत्र प्राचीन कालापासून उपयोजिला जातो.

( ५ ) क्रियापदें :— कबीरांच्या रचनेंत क्रियापदें आणि त्यांचीं अनेक रूपें अशीं सांपडतात कीं त्यांचा उपयोग कबीरांच्या पूर्वीही मराठी साहित्यांत केला गेला आहे. आणि आजही त्यांचा उपयोग त्याच अर्थी तशाच रूपांत केला जातो. या क्रियापदांचा एकतर हिन्दींत अर्थ वेगळा आहे अथवा त्यांचीं रूपें हिन्दींत वेगळींच आढळतात. उदा०—(अ) माँडी — चौपडि माँडी चौहटै, अरध उरध बाजार ।[१७] यांत माँडी (झाँढना, मरा. मांडणें) हे क्रियारूप उपयोगांत आणलें आहे. या क्रियापदाचा अर्थ हिन्दींत – चोळणें, लेपन करणें, तुडविणें असा आहे. या क्रियापदाचा अर्थ मराठींत

---

( ११ ) कबीर ग्रंथावली. पृ. २४ ( १२ ) संक्षिप्त हिन्दी शब्दसागर पृ. २४९. ( १३ ) कवीर ग्रंथावली पृ. ७१ ( १४ ) कबीर ग्रंथावली सटीक ले. डॉ. गोविंद त्रिगुणायत प्रथम संस्करण पृ. २५७ ( १५ ) कबीर ग्रंथावली पृ. ३४. ( १६ ) कबीर ग्रंथावली पृ. २०. ( १७ ) कबीर ग्रंथावली पृ. ४.

रचणें, व्यवस्थित पसरणें, ठेवणें असा आहे. याच अर्थानें कवीरांनी माँडी क्रियापदाचा उपयोग केला आहे.

(आ) घालै, घाल्या ! हरि विचि घालै अंतरा, माया बडी विसास ।[18] या ठिकाणी घालणें (घालना) या क्रियापदाचा प्रयोग केला गेला आहे. हिन्दी शब्द-सागर कोषांत हा प्रांतीय प्रयोग आहे, असा उल्लेख आहे. परंतु कबीर पूर्व मराठींतहि याचा प्रयोग आढळतो. श्री ज्ञानेश्वरांनीं याचा उपयोग आपल्या रचनेंत केला आहे. उदा:.—

वणवा मिया आंधवा । पांखेचि पुसोनि घेयावा ।
पतंगु या हावां । घाली जेवी ।[19]

याचप्रमाणें, पालवै, आण्या, आणिया, पाडी, इ० क्रियापदे होत.

(६) कांहीं विशेष विभक्ति प्रत्ययः— सप्तमीचा इ, (ईं) प्रत्यय.

उदा० घरि परमेसुर पांहुणां ।[20]
आंगणि बेलि अकासि फल ।[21]

या ठिकाणीं घर, आंगण व अकास या अकारान्त शब्दांना सप्तमीचा इ हा प्रत्यय लागला आहे. हिंदींत सप्तमीचे प्रत्यय में, पर हे आहेत. इ हा प्रत्यय कोठेंहीं आढळत नाहीं. हा प्रत्यय मराठींत आढळतो– ईं (इं) या प्रत्ययाचा प्रयोग श्रीज्ञानेश्वरांनीं आपल्या रचनेंत केलेला सापडतो. उदा०

ग्रंथिं, जीवलोकिं, रथिं, द्वारिं, डोंगरिं इ.[22]

(७) कांहीं सामान्य रूपें:—

हरि मोत्यांकी माल है, पो ई काचै तागि ।[23]
कबीर सबसुख राम है, और दुखांकी रासि ।[24]

या उदाहरणांत–मोती आणि दुःख या शब्दांच्या अनेक वचनांना षष्ठीचे की हे स्त्रीलिंगी प्रत्यय लागले आहेत. या शब्दाची खडी बोलीमध्यें हिन्दीप्रमाणें मोतियोंकी, अथवा दुःखोंकी अशीं सामान्य रूपें झालीं असतीं. अथवा व्रज भाषेप्रमाणें मोतियन की, दुखन की, अशीं रूपें झालीं असतीं. परंतु कबीरांच्या रचनेंत आढळणारीं हीं रूपें मराठीला अत्यंत जवळचीं आहेत. मोत्यांकी– मरा० मोत्यांची; दुखांकी– मरा० दुःखांची. यावरून असें वाटतें कीं या ठिकाणी मराठीचा प्रभाव असावा.

---

(१८) कबीर ग्रंथावली पृ. ३३. (१९) महाराष्ट्र शब्द कोश विभाग ३ पृ. १०८४. (२०) कबीर ग्रंथावली पृ. ५६. (२१) कबीर ग्रंथावली पृ. ८६. (२२) श्रीज्ञानेश्वरी–मुंबई राज्य शिक्षणखातें इ. १९६० (२३) कबीर ग्रंथावली पृ. ५६. (२४) कबीर ग्रंथावली पृ. ७६.

( ८ ) याशिवाय कित्येक शब्दांचीं रूपें जशीं मराठींत आढळतात. अगदीं तशींच कबीरांच्या रचनेंत सांपडतात. उदा०

पाहुणा, आपण, लेखणि, पाणी, कारणी, किराणा, ईंधण, साबण, सजणा, अंगणि, जाण, आणि, कागद, डाव, पडदा. ण् व्यंजनांनीं युक्त शब्द मराठीचे असावेत.

( ९ ) कबीरांच्या रचनेंत कांहीं वाक्प्रचार व म्हणी सांपडतात ज्या मराठी म्हणींच्या समान दिसतात. यांत असणारी समानता विशेष उल्लेखनीय आहे. उदा०

( १ ) लागी मोटी खोडि, ( २ ) पानसुपारी खांहि, ( ३ ) तुटै पण छुटै नहिं, ( ४ ) नहितर बेगि उठाइ, ( ५ ) ते घर मरइटसारखे, ( ६ ) पैका पैका जोडता.

वरील विवेचनावरून असें स्पष्ट दिसतें कीं कबीरांनीं उपयोगांत आणलेल्या शब्दांत आणि कित्येक मराठी शब्दांत इतकें साम्य आहे कीं ते शब्द मराठीच आहेत असें म्हटलें तरी चालेल. जर हे मराठीचे शब्द कबीरांनीं आपल्या भाषेंत वापरले असतील तर अन्य भाषांप्रमाणें कबीराच्या भाषेवर मराठीचाही प्रभाव आहे, असें म्हणणें वावगें होणार नाहीं.

---

# ५ संत कवि तुका विप्रकृत श्रीज्ञानेश्वरचरित्राख्यान

( डॉ. रा. ग. हर्षे, पुणे )

## पूर्व रंग

सद्गुरू कृपेचा। अगाध महिमा॥ वेदा जाली सीमा। वर्णूं जातां॥ १॥
तेथें पाड काय। इतर वाणीचा॥ महिमा गुरूचा। वर्णावया॥ २॥
सद्गुरू कृपेची। आगळी करणी॥ कीर्तन रंगणीं। उमटली॥ ३॥
श्रोता वक्ता उभा। वीठल समर्थ॥ वदवी यथार्थ। जालें तैसें॥ ४॥

## उत्तर रंग

**( पितृकुल )** गौतमी तटाकीं। आपेंगांव क्षेत्र॥ परम पवित्र। पुण्ये भुमी॥५॥ तेथील गोविंद। पंत कुळकर्णी॥ वीठलस्मरणी। सर्वकाळ॥ ६॥ नीराबाई पुण्य। पवित्र अर्धांग॥ भरीव सर्वांग। प्रेम सदा॥ ७॥ पंढरीची वारी। आषाढी कार्तिकी॥ भावभक्ति निकी। जयाघरी॥ ८॥ पुत्र संततिची। धरोनिया आस॥ विनवी देवास। नीराबाई॥ ९॥ हरि गुरू भक्ति। परायेण पुत्र॥ परम पवित्र। व्हावा एक॥ १०॥ देवा विनविता। प्रसन जाहले॥ आपपण आले। मुख्य पोटा॥ ११॥ नवविधा भक्ति। भावें आचरली॥ नीराबाई जाली। पुत्रवती॥ १२॥ स्वयेंभ ज्ञानाचा।

पुतळा वीठोबा ॥ जयाचेनी शोभा । सर्वकर्मी ॥ १३ ॥ करतळा मळ । जया वेदच्यारी ॥ निपुण अंतरीं । सर्व विद्या ॥ १४ ॥ पांचवें वरुसीं । जाला व्रतबंध ॥ ज्ञानी वीठो शुद्ध । आईताची ॥ १५ ॥ गोविंद नीराई । विठोबासहित ॥ करावया तीर्थें । चालियेले ॥ १६ ॥ करोनीयां तीर्थ । उत्तर मानस ॥ दक्षण मानस । करूं आले ॥ १७ ॥ आळंदिसी आले । इंद्रायणी तिरीं ॥ यात्रा सिद्धेश्वरी । उतरले ॥ १८ ॥

## मातृकुल

कुळकर्णी तेथें । मुख्य सीदोपंत ॥ गिरिजेचा कान्त । सत्वगुणी ॥ १९ ॥ गिरिबाई सीदो । पंत उभयेतां ॥ येवोनी समस्ता प्रार्थियेले ॥ २० ॥ आश्रम पवित्र करावा समर्थी ॥ केली सीदोपतीं ॥ विनवणी॥ २१ ॥ यात्रा समारंभ । आणिला घरासी ॥ भक्ति भावार्थेसी । पुजावया ॥ २२ ॥ नवविधा भावें । पूजेन भोजेन ॥ यथाशक्तिदान । सर्व केलें ॥ २३ ॥

## स्वप्नदृष्टांत

आनंद लोटला । अर्ध निसीवरी ॥ निद्रा अवसरी । स्वप्न जालें ॥ २४ ॥ सीदोपंत गिरी । बाई पोटीं धन्य ॥ कन्या येक रत्न । नवसाचें ॥ २५ ॥ रखुमादेवी नाम । लावण्यसुंदर ॥ रूप मनोहर । आदि माया ॥ २६ ॥ स्वप्न जालें ऐसें । कन्या हे सुंदरी ॥ बांधा या पदरीं । वीठोबाच्या ॥ २७ ॥

## शुभमंगल

गिरीबाई सीदो । पंत हरुषले ॥ बहु बरे जाले । देवराया ॥ २८ ॥ तेथें तेथें स्वप्न । सारखे जाहलें ॥ लग्न लावियेलें । समारंभें ॥ २९ ॥

## पितामहास देवाज्ञा व पितृसंन्यास

लग्नविध यथा । स्तीत उरकला ॥ निरोप घेतला वीठोबांनीं ॥ ३० ॥

दक्षण मानस । करोनीया तीर्थें ॥ पातले भावार्थें । कासीपुरा ॥ ३१ ॥ माता पितरासी । देवाज्ञा जाहली ॥ वैकुंठासी गेली । उभयेतां ॥ ३२ ॥ वर्णाश्रम वीध । सर्व उरकला ॥ संन्यास घेतला । विठोबाने ॥ ३३ ॥ नरसीं आश्रम । याचे दीक्षाधारी ॥ साधियेली थोरी । शांतिक्षमा ॥ ३४ ॥ चैतन्ये आश्रम । नाम ठेवियेलें ॥ तीर्थें चालियेले । करावया ॥ ३५ ॥ सीस्येसमुदाये । सहित नरसीं ॥ आश्रम तीर्थासी । चालियेले ॥ ३६ ॥ धरोनिया हेत । दक्षण मानस ॥ पातले तिरास । इंद्रायणी ॥ ३७ ॥

## पुनर्मीलन

आळंदीनगर । प्रवेशकरितां ॥ भेटी सीदोपंता प्रथमची ॥ ३८ ॥ साधु सीदोपंतें

आश्रमासी नेले ॥ वीठोबा देखीले । रखुमाइनें ॥ ३९ ॥ गीर्जाबाई. कानी । सांगितली मात ॥ पाहोनी येकांत । रुक्माईने ॥ ४० ॥ चैतन्ये आश्रम । म्हणती जयाला ॥ भ्रतार आपुला तोचि होये ॥ ४१ ॥ निभ्रांत ओळखी । पुरली सर्वांची ॥ सीदोपतें साची । प्रश्न केला ॥ ४२ ॥ सरस्वती स्वामी । साष्टांग नमिलें ॥ वृत्त सांगितलें । होतें तैसें ॥ ४३ ॥ सरस्वें ही खूण । अभंग पुरली ॥ रुक्माइ दिधली । वीठो हातीं ॥ ४४ ॥ गुरू आज्ञा मुख्य । मानोनी वीठलें ॥ आंगिकारियेलें । रुक्माईसी ॥ ४५ ॥ विचारिलें स्वामी । होईल संतती ॥ याची काये गती । पुढ कैसी ॥ ४६ ॥ नरसीं आश्रम । बोलियले बापा ॥ होणं गुरुकृपा । सुखें हो कीं ॥ ४७ ॥

## संन्याशाची संतति

ब्रह्मा विष्णु सीव । आदिमायाच्यार । बाळें धुरंधर । पोटा आली ॥ ४८ ॥ ब्रह्मा तो सोपान । निउर्ति शंकर ॥ विष्णु ज्ञानेश्वर । मुक्तामाया ॥ ४९ ॥ च्यारी बाळें होतां । उभयेतां गेली ॥ वैकुंठासीं भली । ब्रह्मानंदें ॥ ५० ॥ उरली हे बाळें । च्यारी निराश्रित ॥ न करिती व्रत । बंध कोणी ॥ ५१ ॥ संन्याशाची मुलें । म्हणोनि हेळिती ॥ तेणे चौघा चित्तीं । उद्विगता ॥ ५२ ॥

## प्रतिष्ठानास गमन

निव्रत्तिसोपानें विचार योजीला जावें पैठणाला । ज्ञानदेवा ॥ ५३ ॥ अवस्यें म्हणोनी । वंदीले चेरण ॥ चालिले पैठण । पहावया ॥ ५४ ॥ पतितजनाचा । फेडावया पांग ॥ चालिले अभंग । देवच्यारी ॥ ५५ ॥ पावले पैठण । नमीले भूदेव ॥ सांगितला भाव । स्वागताचां ॥ ५६ ॥ व्रतबंध होणं । म्हणोनीया आलों ॥ पाहोनी तोषलो । द्विजवरा ॥ ५७ ॥ जेणे लागे आम्हा । पवित्रना गाढी ॥ ते युक्ति रोकडी । करावी जी ॥ ५८ ॥ द्विजवरा भावें । करोनि विनंति ॥ उभ्या वेदमुर्ति । बाळ बैसें ॥ ५९ ॥ संन्याशाची मुलें। बैसे? द्वेसिती म्हणोनी ॥ शास्त्रार्थ पाहोनी । सकळहीं ॥६०॥ न मानिती द्विज । हेळोनी बोलती ॥ ज्ञानदेवा चित्तीं । अनुताप ॥ ६१ ॥

## ज्ञानेश्वर—द्विज खटका

बोलियेले द्विज । अस्तारे मुला ॥ तेधवां बोलिला ज्ञानदेव ॥ ६२ ॥ कासयांनं थोरी । तुजलारे आली ॥ अहंकार भुली ॥ सांडी आतां ॥ ६३ ॥ वाचोनी पढोनी । शहाणे जाहाला ॥ थोरपणा आला । तेणें काय ॥ ६४ ॥ उलिस दिसत । म्हणताती पोर ॥ बोले नीचोत्तर । वरं कीं हो ॥ ६५ ॥ ज्ञानोबा म्हणती । द्विज हो ऐकारे ॥ ब्रह्मीं सान थोर । काय बोली ॥ ६६ ॥ बोलतां वरळ । नुमज हे तुम्हा ॥ ब्रह्म ठावें आम्हा । सर्वा घटीं ॥ ६७ ॥

## टोणग्यामुखीं वेदोच्चार

तें क्षणीं टोणगा। त्याची ठाया आला ॥ वरूति पाखला भरोनियां ॥ ६८ ॥ ज्ञाने-श्वराकडे। पाहोनी रोंकला ॥ ज्ञानेश्वरें केला। नमस्कार ॥ ६८ ॥ कांरे केलें पोरा। नमन तयासी ॥ 'तुम्हा आम्हा त्यासी भेद काये?' ॥ ७० ॥ खवळले द्विज। ऐको-निया बोल ॥ समता होईल कैसी पोरा ॥ ७१ ॥ वेद म्हणूं आम्ही। तैसा म्हणे काय ॥ म्हैसा येक होये। द्विज कैसा ॥ ७२ ॥ नवल या गोष्टी। काय द्विजराव ॥ करी तरी देव। काय नव्हे ॥ ७३ ॥ हाचि रेडा वेद। करील उच्चार। ऐसे ज्ञानेश्वर। बोलि-येले ॥ ७४ ॥ सर्वांगें भरला। द्विजांचिया कोप। वातला संकल्प। रेडियासी ॥ ७५ ॥ बोलेव हारेडा। वेदा पोरा आतां ॥ नाहीं तरी जातां। जीवें च्यारी ॥ ७६ ॥ याचि रेड्यापायीं। नेमिलें मरण ॥ न बोलतां जाण। वेद रेडा ॥ ७७ ॥ ज्ञानोबा म्हणती। ऐका महाराज ॥ येथें काय काज। बहु बोलीं ॥ ६८ ॥ चित्तवृत्ति स्थिर। करो-नीया बैसा ॥ बोलल हा म्हैसा वेद च्यारी ॥ ७९ ॥ हासीनले सर्व। बैसले निवांत ॥ वदला वेदांत पशु रेडा ॥ ८० ॥ सांगोपांग चहुं। वेदांचा उच्चार ॥ केला, द्विजवर। डोलविले ॥ ८१ ॥ जैजेकार केला। स्वर्गी सुरवरीं ॥ विमानें अंबरीं। पुष्पवृष्टि ॥ ८२ ॥ प्रतिष्ठानपुरा। आनंद ओतला ॥ रेडा बोलविला। ज्ञानदेवें ॥ ८३ ॥ संतोषले देव। द्विज सकळिक ॥ पंडित वैदिक। अग्निहोत्री ॥ ८४ ॥ शास्त्री पुराणीक। योगी वीत-रागी ॥ राव रंक मुंगी। संतोषले ॥ ८५ ॥ साष्टांग नमीले। सर्वी ज्ञानेश्वर ॥ सत्य अवतार म्हणवोनी ॥ ८६ ॥ निरोप घेवोनी। तैसेचि निघाले ॥ नेवासिया आले। ब्रह्मानंदें ॥ ८७ ॥ मोहनी राजाचे। देवालयी वास ॥ केला अनायास। मार्गी जातां ॥ ८८ ॥ तेथे सचोपंत। बाबा ठाणेदार ॥ पंताचे चाकर हेमाद्रिया ॥ ८९ ॥

## यथार्थ गीतार्थाविषयीं राजास लागलेली तळमळ

रामदेव राजा। प्रधान हेमाद्रि ॥ दोघे अवतारी। पुण्येवंत ॥ ९० ॥ गीतार्थेसी चाली। अभंग जयाची ॥ आवडी गीतेची ॥ ९१ ॥ लंकेसीं हेमाद्रि। पंत जेव्हां गेले ॥ छेपन्नहि आणिले। ग्रंथ त्यांणीं ॥ ९२ ॥ छेपन्न भाषेचे। छेपन्नहि ग्रंथ ॥ पाहिले यथार्थ। शोधोनिया ॥ ९३ ॥ राया मनीं अर्थ। एकहि न बाणे ॥ गीता योग्य लेणे। अर्थ नोव्हे ॥ ९४ ॥ गीतार्थ नेटका। प्राकृत पहावा ॥ राजयाच्या जीवा। वेध ऐसा ॥ ९५ ॥ नेवासीयामध्यें। सचोपंत होते ॥ सवळ भावार्थे। ज्ञानसिंधु ॥ ९६ ॥ तया हटकीले। हेमाद्रिपंतांनी ॥ तेचि आले दिनी। ज्ञानेश्वर ॥ ९७ ॥ सचोपंत बाबा। दौलताबादेसी ॥ तूर्त जावयासी। निघालो ती ॥ ९८ ॥ देवाचे दर्शन। घ्यावया चालीले ॥ ज्ञानोबा भेटले। देवद्वारीं ॥ ९९ ॥ नमन साष्टांग। घालोनी विनंति ॥ केली सचोपंतीं। ज्ञानदेवा ॥ १०० ॥ मज आले जाणें। दौलताबादेसी ॥ राज आज्ञा ऐसी। तूर्त आहे ॥ १०१ ॥ परतोनी भेटी। याचि स्थळीं व्हावी ॥ ये विसीं करावी। आज्ञा काय ॥ १०२ ॥

करा कार्य सिद्धि। मेटी परतोनी ॥ होईल कीर्तनी । याचि स्थळीं ॥ १०३ ॥ आज्ञा वंदो-नियां । पंत चालियेले ॥ दौलता पातले । बादकिल्ला ॥ १०४ ॥ हेमाद्रिपंताचे । दर्शन होतांचि ॥ मुख्य काज हेंचि । सांगितलें ॥ १०५ ॥ गीतेचा प्राकृत । अर्थ कोणी करी ॥ ऐसा पृथ्वीवरी । शोध करा ॥ १०६ ॥ आज्ञा म्हणोनियां । निरोप घेतला ॥ नेवासे पातला । सचोपंत ॥ १०७ ॥ ज्ञानदेवा केलें । नमन साष्टांग ॥ वृत्तांत अभंग । सांगितला ॥ १०८ ॥ आज्ञा आतां काय । करणें करावी ॥ कार्य सिद्धि व्हावी । तूर्त ऐसी ॥ १०९ ॥

## ज्ञानेश्वरीजन्म

निवृत्ति बोलले । ज्ञानोबा ऐकावें ॥ कार्य त्वा करावें । गृहस्थाचे ॥ ११० ॥ बरे म्हणोनियां । दिधला निरोप ॥ तरणी प्रताप । ज्ञानराये ॥ १११ ॥ सचोपंत गेले । आपुल्या घरासी ॥ लागले यत्नांसी । ग्रंथाचिया ॥ ११२ ॥ शाई केली, साचे । कातरीले बरे ॥ लेखण्या सुंदर । सिद्ध केल्या ॥ ११३ ॥ निवृति सोपान । मुक्ताई निजेली ॥ ज्ञानदेव केली । युक्ति गाठी ॥ ११४ ॥ कोळसा घेवोनी । देवालयावरी ॥ गीता ज्ञानेश्वरी । अर्थ केला ॥ ११५ ॥ साडे तीं घटिका । ओवीयां टिपण ॥ गीतार्थ प्रमाण । निवडिला ॥११६॥ प्रातःकाळ होता । सचोपंत आले ॥ नमन घातलें । ज्ञानदेवा ॥११७॥ शाई साच्या सिद्ध । लेखणीया स्वामी ॥ ग्रंथ मनोधर्मी । सिद्ध व्हावा ॥ ११८ ॥ ज्ञानोबांनी तया । दाविलें देऊळ ॥ लिहीलें सकळ । गीतार्थानें ॥ ११८ ॥ गीतार्थ लिहिला । देऊळावरता ॥ येतो कैसा हाता । तूर्तातूर्त ॥ १२० ॥ मायोत्तरें काज । अपूर्व जाहलें ॥ परंतु राहीलें । भिंतीवरी ॥ १२१ ॥ सचोपंत बाबा । तेणें चिंतातूर ॥ देखीलें साचार । निवृत्तीनें ॥ १२२ ॥ निवृति म्हणेती । ज्ञानोबा सुजाणा ॥ मनीचिया जाणा । ग्रहस्ताचे ॥ १२३ ॥ आज्ञा म्हणोनीया । लेखणी धरिली ॥ तेचि हाती दिली । सचोपंता ॥१२४॥ साडे तीं घटिका ।ग्रंथ झाला सिद्ध ॥ सर्व गुण शुद्ध । नीरूपम ॥१२५॥ गत केली च्यार । चार हजार तीनशें ॥ नवद वरूसें । लोटलियां ॥ १२६ ॥ शालीवान शके । बारासे बारांत ॥ सिद्ध जाला ग्रंथ । ज्ञानेश्वरी ॥ १२७ ॥ लेखीक जाहाले । सदा-चिदानंद ॥ बाबा नाम शुद्ध । सचोपंत ॥ १२८ ॥ टोणग्याचे मुखें । वेद बोलविला ॥ तैसाचि हा केला । किर्ती घोष ॥ १२९ ॥ साडे तीं घटिका । ग्रंथ सिद्ध केला ॥ पुढें देखियेला ।.सचोपंतीं ॥ १३० ॥ तेचि क्षणीं सिद्ध । सचोपंत जाले ॥ चरण वंदिले । ज्ञानोबाचे ॥ १३१ ॥ ग्रंथ पाववीला । दौलता बादेसी ॥ हेमाद्रि पंतासी । ब्रह्मानंद ॥ १३२ ॥

## राजाचें वैराग्य

राजा सदरेसी । बैसला उदार ॥ सर्वज्ञ चेतुर । ज्ञाननिधि ॥ १३३ ॥ तया पुढें ग्रंथ । आणोनि ठेविला ॥ राजा संतोषला । बहुतेणें ॥ १३४ ॥ सचोपंती आज्ञा । राया मागितली ॥ चाकरी ठेविली । पायावरी ॥ १३५ ॥ पुत्राचिया नांवें । धंदा सांगितला ॥

निरोप दीधला । सचोपंता ॥ १३६ ॥ हेमाद्रिपंतांनी । वाचीयला ग्रंथ ॥ राये केला अर्थ । मनालेसा ॥ १३७ ॥ वाकनिसें अर्थ । पारसी लिहिला ॥ राजा वोलियेला । जैसा तैसा ॥ १३८ ॥ येक पारायेणी । जाला वीतराग ॥ केला राज्येत्याग । मनोभावें ॥ १३९ ॥ राज्येभार केला । स्वाधीन पुत्राचें ॥ घ्यावया ग्रंथीचे । सुख सर्व ॥ १४० ॥ घेवोनीयां ग्रंथ । वेरूळासी गेले ॥ गुंफेत सीरले । चौघेजण ॥ १४१ ॥ प्रधान हेमाद्रि । राजा, सेनापति ॥ वैराग्य विभूति । लेवोनियां ॥ १४२ ॥ पाणका ब्राह्मण । भोळा ऐसे चार ॥ जाले शुद्ध नर । वीतरागी ॥ १४३ ॥ अमर असावें । न मरावें कदा ॥ आनंद सर्वदा । सर्व काळा ॥ १४४ ॥ सर्व गुण ऐसा । ग्रंथ संपवित ॥ घेवोनी गुंफेत । प्रवेशले ॥ १४५ ॥ सचोपंत बाबा । नेवासे पातले ॥ साष्टांग नमीले । ज्ञानराज ॥ १४६ ॥ गेलीया पासोनी । जालें वर्तमान ॥ देवा पासीं ज्ञान । सांगितलें ॥ १४७ ॥

## ज्ञानेश्वरीवरील गंडांतर

बरें जालें आतां । देउळीचा लिखा ॥ उतरा नेटका । पत्रावरी ॥ १४८ ॥ येक मासा ग्रंथ । पत्रीं उतरला ॥ लिखा तो पुसीला । देउळीचा ॥ १४९ ॥ चौदा विद्या, कळा । चौसष्टी साधनें ॥ नाना युक्ति धने । तया ग्रंथी ॥ १५० ॥ निव्रत्तिरायांनीं । बुडविला ग्रंथ ॥ तोहि पाणीयांत । ज्ञानेश्वरी ॥ १५१ ॥ सदचीदानंद । बाबांनी विनंति ॥ ग्रंथ असो क्षितीं । स्वामीराया ॥ १५२ ॥ तेधवा तो ग्रंथ । बाहीर काढीला ॥ गळोनीया गेला । अर्थ कांही ॥ १५३ ॥ नाना कळा नाना । साधनाच्या युक्ति ॥ गळाल्या समस्तीं । एकंदर ॥ १५४ ॥ तुटक उरला । ग्रंथार्थ जेधवां ॥ बोलीले तेधवां । ज्ञानदेव ॥ १५५ ॥ पुढे अवतार । येकनाथ होणें ॥ तेधवां करणें शोध याचा ॥ १५६ ॥ आजपासोनीयां । प्रमाण होतील ॥ दोन शत झाले । चौऱ्याणव ॥ १५७ ॥ ग्रंथाचा या शोध । तेव्हां येकनाथ ॥ करील यथार्थ । प्रतिष्ठानीं ॥ १५८ ॥

## चांगा—ज्ञाना भेट

निघोनियां गेले । आळंदी क्षेत्रासी ॥ वृत्त चांगयासी । कळले हें ॥ १५९ ॥ भेटीसी वैसोनी । वाघावरी आले ॥ हातीं धरीयेले, महाफणी ॥ १६० ॥ ज्ञानदेवा, पुढें । निरोप धाडोला ॥ यावें भेटायाला । समारंभें ॥ १६१ ॥ ज्ञानोबा बैसले । होते भिंतीवरीं ॥ चालीले सामोरी । चांगदेवा ॥ १६२ ॥ देखोनियां वाघ । भिंतीसी वुजला ॥ टाकोनी दीधला । चांगदेवा ॥ १६३ ॥ पडतां धरणीं । भुजंग पळाले ॥ बारा वाटा चाले । चौदा शती ॥ १६४ ॥ उरले चांगोबा । येकुलतें येक ॥ पळाले सेवक । जवळीचे ॥ १६५ ॥ चांगया ज्ञानोबा । प्रीतीनें भेटले ॥ भेटीसी पातले । मुक्ताईच्या ॥ १६६ ॥ मुक्ताईचें भेटीं । झाला साक्षात्कार ॥ चांगया साचार । उद्धरिला ॥ १६७॥ पंढरीसी आले । भेटी नामयाचे ॥ सख्यत्व जनीचे । पहावया ॥ १६८ ॥

## पंढरीची यात्रा व संतभेटी

चोखा मेळा गोरा । कबीर सांवत ॥ परसा भागवत । नरहरी ॥ १६९ ॥ भाविकाच्या भेटी । जाहल्या सकळ ॥ करूं तीर्थावळ । चालीयेले ॥ १७० ॥ जडमूढ प्राणी । उद्धरीले सर्व ॥ रंक॰ आणि राव । दरुशणें ॥ १७१ ॥ परतोनी आले । पंढरपूरासी ॥ जोडीयेल्या रासी । स्वानंदाच्या ॥ १७२ ॥ तेथें आले राव । पंडीत चेतुर ॥ कोठे ज्ञानेश्वर । म्हणोनीया ॥ १७३ ॥

## पंढरपूर येथील चमत्कार

रेडियाच्या मुखें । वेद बोलविले ॥ पंडींत कोपले । ऐकोनियां ॥ १७४ ॥ ज्ञानेश्वरा वेद । बोलविसी आतां ॥ पंडीत बोलतां । वंका आला ॥ १७५ ॥ बाईलेचा भाऊ । चोखा मेळीयाचे ॥ वंका नाम त्याचें अतिशूद्र ॥ १६६ ॥ ज्ञानोबा बोलती । गब्या तूं कोण रे ॥ वंका मी महार । बोलीयेला ॥ १७७ ॥ आडवी ओढली । रेघ त्या पुढती ॥ ज्ञानोबा बोलती । आरता ये ॥ १७८ ॥ वंका आला आंत । रेघेच्या जेधवां ॥ बोलवीला तेव्हां । कोण रे तुं ॥ १७९ ॥ बोलीयेला वंका । शूद्र मी चांगला ॥ आलों वंदावया । संत पाया ॥ १८० ॥ दुसरी ओढली । त्यापुढें रेघ । आंत आला मग । बोलविला ॥ १८१ ॥ वैस्य मी चांगला । बोलीयेला वंका ॥ पातलों पादुका । वंदावया ॥ १८२ ॥ वोढियेली रेघ । त्यापुढं तिसरी ॥ येताची भीतरी । वंका बोले ॥ १८३ ॥ कोण विचारीतां । क्षेत्री बोलीला मी ॥ वंदावया स्वामी । पाये आलों ॥ १८४ ॥ तयापुढें रेघ । वोढीली चवथी ॥ पालटली वृत्ति । वंकयाची ॥ १८५ ॥ विचारितां कोण । 'हरि'हि वदला ॥ वंका बोलीयेला । ब्राह्मण मी ॥ १८६ ॥ आज्ञा काये स्वामी । जोडीयेले हात ॥ ज्ञानोबा समर्थ संतराव ॥ १८८ ॥ ज्ञानदेवें तेव्हां पंडींत दावीले ॥ दंड थापटीले । वंकीयानें ॥ १८८ ॥ ज्ञानदेवा केलें । पंडीते नमन ॥ अवतार धन्य । होयेसी तूं ॥ १८९ ॥ चेंद्रभागे जातां । उभाउभी ऐसे ॥ आनंदसरिसें । काज केलें ॥ १९० ॥

## समाधि व शेवटचे चार शब्द

अवतार आला । शेवटासी जेव्हां ॥ चालीयेले तेव्हां । आळंदिसी ॥ १९१ ॥ सनकादिकांचा । घेवोंनिया मेळा ॥ चालिला सावळा । आळंदिसी ॥ १९२ ॥ संत समुदाय । अनंत अपार ॥ मध्यें ज्ञानेश्वर । हरि गाती ॥ १९३ ॥ इंद्रायणी तीर । आळंदी पावले ॥ तारू सांगितले । हरिपाठ ॥ १९४ ॥ हरिनाम गर्जा । नाहीं भय चिंता ॥ खुण हे समस्तां । सांगितली ॥ १९५ ॥ धांव घ्यारे बापा । पंढरपूरासी ॥ ठाव सार्थकासी । येतुलाची ॥ १९६ ॥ डोळेभरी । पहा । पंढरीचा राणा ॥ भावें हरि म्हणा । सर्वकाळ ॥ १९७ ॥ विटेवरी उभें । साकार सांवळें । महद्भूत भोळें । पंढरीचे ॥ १९८ ॥ वेदाचें जिव्हार । आगर मुक्तीचें ॥ चोविसा मूर्तीचें । उद्धरण ॥ १९९ ॥ वेदांत सिद्धांत ।

जयाला वर्णिती ॥ उभी ते हे मूर्ति । विटेवरी ॥ २०० ॥ सकळ जीवाचा । उद्धार सगट ॥ पंढरी वैकुंठ । देखिलीयां ॥ २०१ ॥ कोटीकळा मुक्ति । पाहातां कळस ॥ खूण हे सर्वांस । सांगितली ॥ २०२ ॥ विश्वास पंढरी । तरीक सकळां ॥ पाहा येक वेळां । डोळेभरी ॥ २०३ ॥ हरि नाम प्रीति । सकळहि गर्जा ॥ लावा कीर्ति ध्वजा । सुचविले ॥ २०४ ॥ चालिले समाधि । ज्ञानेश्वर जेव्हां ॥ गजर तेधवां । नानापरी ॥ २०५ ॥ टाळ वीणे भेरी । मृदंग चिपळीं ॥ कीर्तन धुमाळी । ब्रम्हानंद ॥ २०६ ॥ अंबरी दाटल्या । विमानाच्या थाटी ॥ देव पुष्पवृष्टी । करिताती ॥ २०७ ॥ धन्य ज्ञानदेवा । मानव जालासी ॥ जन तारायासी । भक्तिभावें ॥२०८॥ जै जैकार केला । सर्व सुखरीं ॥ समाधी भीतरीं । प्रवेशले ॥ २०९ ॥ अभय वरद । वचन भावीक ॥ दिल्हे सकळीका । येंकंदर ॥ २१० ॥ भक्तिभावें चाला । बोला हरि गुण ॥ तरा च्यारी वर्ण । भवसिंधु ॥ २११ । सांडा काम क्रोध । शांति क्षमा धरा ॥ भवसिंधु तरा । सकळीक ॥ २१२ ॥ निरोप सकळा । आसीर्वाद प्रीती । । ज्ञानदेव देती । तरावया ॥ २१३ ॥ देव करील ते । सहज होईल ॥ पाषाण तारील । जळावरी ॥ २१४ ॥ हरि भक्तिकाजों । सादर असावें ॥ तरोनी तारावें । आगीकासी ॥ २१५ ॥ जडमूड जीव । लावावें भजना ॥ सेवट सूचना । भाविका हे ॥ २१६ ॥ सकळहि नटा । कीर्तनाचे वृत्ति ॥ करा क्षिरापती । खेळा काला ॥ २१७ ॥ नका करूं कथा । बाजारोबाजार ॥ माळ येकंदर लावूं नका ॥ २१८ ॥ खोटे ब्रह्मज्ञान ॥ कोणा सांगू नका ॥ संतपायीं वांका । सर्वभावें ॥ २१९ ॥ नवविधा भक्ति । नैरास्य कीर्तन ॥ करावें साधन । संतप्रिये ॥ २२० ॥ हरि म्हणा आतां । समाधि बैसले ॥ ज्ञानदेव गेले । निजधामा ॥ २२१ ॥

## कवित्वाचा काल व स्थल

नित्य नेम कथा । ब्रह्मपूर ठाणी ॥ विठ्ठल रुक्मीणी । उरूंवुरूं ॥ २२२ ॥ चेइत्र वसंत । कृष्णसप्तमीसी ॥ भोमवार निसी । कृष्णा तिरीं ॥ २२३ ॥ गत कालीच्यार । हजार आठसे ॥ सत्तर प्रत्यक्ष । चालियेले ॥ २२४ ॥ शालीवान शक । सोळासे व्याणव ॥ श्रोता वक्ता देव । दतात्रेय ॥ २२५ ॥

## चारही भावंडांचीं समाधि स्थळें व आळंदी तीर्थ महात्म्य

सासवडीं देवा । सोपान समाधि ॥ ब्रह्मागिरीमधीं । मुक्ताबाई ॥ २२६ ॥ समाधिस्त जाहाले । तीर्थ कुशावर्ती ॥ शंकर निवृत्ति । अवतार ॥ २२७ ॥ कृष्ण एकादसी । कार्तिक आळंदी ॥ अभंग समाधी । ज्ञानोबासी ॥ २२८ ॥ देवोनी समाधि सर्व सुरवरीं ॥ इंद्रायणी तिरीं । वास केला ॥ २२९ ॥ कोनकाचा तरू । जयाचिये द्वारीं॥ इंद्रायणी तिरीं । आळंदिसी ॥ २३० ॥ अज्ञान रोविला । दंडतो द्वारेसी ॥ पल्लव तयासी । अज्ञोणीयां ॥ २३१ ॥ यात्रा समारंभ । आजीवरी मोठा ॥ पंढरी वैकूंठा । समसाम्ये ॥ २३२ ॥ आळंदी संताचें माहेर देखीलें ॥ पावन जाहालें । जन्मांतर ॥ २३३ ॥ मोक्ष मुक्तिजया ॥ चेरणा लागती ॥ आळंदिसी जाती । तयाचीया ॥ २३४ ॥

## गुरुकृपेचा महिमा

गुरुकृपेवीन । ऐसे लाभ कैंचें ॥ कृपे सद्‌गुरुचे । सर्वलाभ ॥ २३५ ॥ गुरूकृपा तेथे । सर्व सुख रासी ॥ सप्त बोले ऐसी । वेदश्रुती ॥ २३६ ॥ श्रोता वक्ता देव । आपण जाहला ॥ चेरित्र वदला । कथारंगीं ॥ २३७ ॥ ज्ञानोबाचा आवतार येकनाथ ॥ वरदी श्रीदत्त । प्रतिष्ठानी ॥ २३८ ॥

## ज्ञानेश्वरांची गुरुपरंपरा

आदिनाथ गुरु । श्री सीव शंकरा ॥ तयाचा मछींद्र । उपदेसी ॥ २३९ ॥ मछींद्र-नाथाचे । गोरक्ष वरदी ॥ तयाचा प्रसादी । गैनीनाथ ॥ २४० ॥ गैनीचे निवृत्ति । पाद-प्रसादित ॥ तयाचा अंकीत । ज्ञानदेव ॥ २४१ ॥

## तुकाविप्रांची गुरुपरंपरा

आदिगुरू परात्पर नारायेण । तयाचे प्रमाण । सीस्य अत्रि ॥ २४२ ॥ अत्रिचे श्रीदत्त । दत्ताचे अंकित ॥ अभंग कलींत । जनार्दन ॥ २४३ ॥ जनार्दनवर । येकनाथ राया ॥ येकोबाची दया । विश्वनाथ ॥ २४४ ॥ विप्रनाथ राया । कृपा विश्वेश्वर ॥ त्रिमूर्ति साचार । विप्रतरु ॥ २४५ ॥ विप्रचेरणीचा । रजरेणु तुका । निमित्यांसी लोकां । दावितातो ॥ २४६ ॥

## उपसंहार

कर्ता करविता । सर्वहि आपण ॥ निमित्य प्रमाण । तुका विप्र ॥ २४७ ॥ ज्ञानोबा आपण । आपुले चेरित्र ॥ वदले पवित्र । पुण्यदाई ॥ २४८ ॥ आपुली आवडी । आपण वदले ॥ निमित्य दाविले । तुका विप्र ॥ २४९ ॥ तुका विप्र म्हणे । सद्गुरू गरीमा ॥ हरिहर ब्रम्हा । न जाणती ॥ २५० ॥

## टीपा

( १ ) गोविन्दपन्त कुलकर्णी–निराबाई पुत्र विठ्ठल यांच्या संबंधांत गहिनी नाथांचा उल्लेख नाहीं-पंढरीची वारी व उभयतांची विठ्ठलभक्ति यांचा उल्लेख आहे. ‘ विठ्ठल स्मरणीं सर्वकाळ ’ ( ६ ) नाथसंप्रदायी अव्यक्त ब्रह्माचे उपासक व ॐकाराचा जप करणारे. असें असतांना नाथांचा विठ्ठलाशीं संबंध कसा जोडतां येतो हें कोणीच लक्षांत घेत नाहीं. ( २ ) ‘ स्वयंभ ज्ञानाचा । पुतळा विठोबा ॥ जयाचेनी शोभा सर्व कर्मा ( १३ ) करतळामळ । जया वेद च्यारी । निपुण अंतरीं । सर्व विद्या ’ ( १४ )–ही सर्व अतिशयोक्ति दिसते. ( ३ ) ‘ पांचवें वरुसीं । जाला व्रतबंध ’ ( १५ )–ब्रह्मवर्च-स्काम ( वेदाध्ययन करूं इच्छिणाराचा व्रतबंध पांचव्या वर्षी हा मनुप्रोक्त आचार ) ( ४ ) ‘ गोविंद नीराई विठोबासहित करावया तीर्थे । चालियेले ’ ( १६ ) अन्यत्र विद्याध्ययन

समाप्तीनंतर एकटाच विठोबा तीर्थयात्रेस निघून गेल्याचा उल्लेख आहे. ( ५ ) ' करोनिया तीर्थ उत्तरमानस । दक्षिणमानस करूं आले ( १७ ) ' आदिमध्यें उल्लेखिलेल्या स्थळांवरून विठ्ठलाच्या तीर्थयात्रेची निश्चित कल्पना येत नाहीं. त्या काळचे तीर्थयात्रेचे मार्ग कोणते होते त्यांत आळंदी बसते कां तें पाहिलें पाहिजे. केशवकृत नाथचरित्रांत एकनाथांच्या वेळीं येथें घनदाट अरण्य असल्याचा उल्लेख आहे. ( ६ ) मातापित्यांसह विठोबा आळंदीस आले व त्यांचें सिधोपंत कुलकर्णी यांनीं स्वागत केलें व त्यांस भोजनास व राहण्यास घरीं घेऊन गेले ही गोष्ट अन्यत्र नाहीं. पण ती येथें स्वाभाविक वाटते. ( ७ ) उभयतांस एकच स्वप्न पडल्याची कथा येथेंहि आहे. पण त्यानंतरचा विस्तार ( भक्तितत्त्वामृत रहस्य पाहा ) येथें नाहीं. ( ८ ) लग्नोत्तर दक्षिणमानस यात्रा पुरी केल्याचा उल्लेख; मात्र पंढरपुरास उभयता जाऊन आल्याचा येथें उल्लेख नाहीं. ( ९ ) यानंतरचें विठोबाचें चरित्र इतकें त्रोटक आहे कीं लग्नोत्तर घडलेल्या घडामोडींचा नीट उलगडा होत नाहीं. ' दक्षणमानस ( म्हणजे कोणतें स्थान ? ) करोनियां तीर्थें । पातले भावार्थें । कासीपुरा ( ३१ ) मातापितरासी । देवाज्ञा जाहली । वैकुंठासी गेली । उभयेता ( ३२ ) वर्णाश्रमवीध । सर्व उरकला । संन्यास घेतला विठोबानें ( ३३ ) (१०) विठ्ठलानें संन्यासदीक्षा ' नरसीआश्रम ' यांच्याकडून घेतल्याचा उल्लेख नवा आहे । नांवहि ' चैतन्याश्रम ' असें अन्वर्थक दिलें आहे. ( ३५ ) रामानंद व चैतन्य किंवा श्रीपादाश्रम व चैतन्य ही जोडी जमत नाहीं. संन्याशांचे जे अनेक पंथ आहेत त्यांस पुरी, गिरी, अरण्य, सरस्वती, भारती, चैतन्य, आनंद वगैरे भिन्नभिन्न नांवें आहेत. त्यांत भेसळ करतां कामा नये. नाथ संप्रदायांत अवधूतपंथी लोकच संन्यासमार्गी असतात. मत्स्येन्द्रनाथांचा आनंद संप्रदाय समजला जातो व त्या परंपरेंतील सर्वांचें दीक्षानाम ' आनंदान्त ' असलें पाहिजे ही अपेक्षा आहे. या परंपरेंतील सच्चिदानंद, प्रकाशानंद ( सोपानदेवशिष्य ) हींच आनन्दान्त नांवें रूढ आहेत हेंही येथें लक्षांत घेतलें पाहिजे. नाथसंप्रदाय व संन्यास हें कितपत सुसंगत आहे याचाहि विचार झाला पाहिजे. ( ११ ) नृसिंहाश्रमांचे शिष्यासह आळंदीस येणें, सिधोपंताच्या घरीं ' पुडीस ' आले असतां सर्व उलगडा होणें अधिक स्वाभाविक आहे. तेथेंच विठ्ठलपंतास गृहस्थाश्रमस्वीकाराची आज्ञा; परंतु संततीचें काय होणार याचें नृसिंहाश्रमांचें उत्तर गुळमुळीतच आहे ( ४०–४७ ). ( १२ ) ' चारी बाळें होतां । उभयेतां गेली । वैकुंठासी भली । ब्रह्मानंदें ' ( ५० ). केव्हां आणि कोठें याचा तपशील दिला नाहीं. अन्यत्र मुलांचें उपनयन करण्यासाठीं विठ्ठलपंत नाशकास गेल्याचा उल्लेख आहे. संन्याशाचीं मुलें म्हणून वाळींत टाकल्याची गोष्ट येथें गृहीत धरली आहे. ' संन्याशाचीं मुलें । म्हणोनी हेळिती । तेणें चौघा चित्तीं । उद्विग्नता ' ( ५२ ) ( १३ ) निवृत्ति व सोपान ज्ञानदेवाच्या विचारानें पैठणास जातात. मध्यंतरीं निवृत्तिनाथास ब्रह्मगिरीवर गहिनीनाथाचा उपदेश झाल्याची व त्यानें ज्ञानदेवास व ज्ञानदेवानें सोपानदेव मुक्ताबाईस उपदेश दिल्याची भक्तितत्त्वामृतरहस्यांतील कथा येथें वाळली आहे. ( १४ ) ' ज्ञानेश्वरद्विजखटका ' यांतील विधानें एकनाथांच्या एका

रूपकावर आधारित असल्याचें नारायण केशव विप्रांनीं आपल्या टिपणींत दिलें आहे. ' आरता येरे धाकुल्या मुला । कशानं थोरपण आलंय तुला । उलिसच कीं रे दिसतें पोर । ब्रह्मीं नाहीं लहान थोर । तुला ब्रह्म ठाउकें आहे । सर्वा घटीं तेंचि पाहें ( गाथापंचक ३७४४ पान २८४ ). ( १५ ) रेड्यामुखें वेद बोलविल्याचा चमत्कार व अतिशयोक्तवर्णन ' जैजेकार केला । स्वर्गी सुरवरीं । विमानें अंबरीं । पुष्पवृष्टि ' ( ८२ ) ( १६ ) नेवाश्याचे ठाणेदार सचोपंत हेमाद्रीचे सेवक. रामदेव राजा व हेमाद्री यांस गीतार्थाची तळमळ यासंबंधीं उल्लेख भक्तितत्त्वामृतरहस्यांत आहे. ' छपन्न भाषेच्या ग्रंथांचा उलगडा ' यांत केला आहे ( ज्ञानेश्वरीतील उल्लेख ). ' लंकेसी हेमाद्री । पंत जेव्हां गेले । छेपन्न आणिले । ग्रंथ त्यांणीं ( ९२ ) । छेपन्न भाषेचे । छेपन्नहि ग्रंथ । पाहिले यथार्थ शोधोनीया ( ९३ ) । राया मनीं अर्थ । एक हीन वाणें । गीता योग्य लेणें । अर्थ नोहे ( ९४ ) । गीतार्थ नेटका प्राकृत पाहावा । राजयाच्या जीवा वेध ऐसा ( ९५ ) सचोपंतास याविषयीं सांगायला व ज्ञानदेव नेवाश्यास यायला एकच गांठ. ( १७ ) ज्ञानेश्वरीची जन्मकथा— कोळश्यांनीं मंदिराच्या भिंतीवर गीता लिहिल्याची कथा पांगारकरांनीं दिली आहे. पण भक्तितत्त्वामृत रहस्यांत हा चमत्कार नाहीं. तेथें सच्चिदानंद बाबांच्या पुनर्जीवनाचा चमत्कार वर्णिला आहे. ( १८ ) रामदेव, हेमाद्रि, सेनापति व पाणक्या ब्राह्मण यांनीं वेरूळच्या गुहेंत केलेल्या ज्ञानेश्वरीपठनाची कथा नवीन आहे. ( १९ ) ज्ञानेश्वरी ग्रंथ पाण्यांत बुडविल्याची कथा, त्यांतील चौदा विद्या चौसष्ट कला या धन-साधनांचें वर्णन, तो पुनः पाण्यांतून बाहेर काढतांना नष्ट झालें ' एकनाथ आवृत्तीची भविष्यवाणी इत्यादि चमत्कार यांत वर्णिले आहेत. ( २० ) साडे तीन घटकांत कोळशानें ज्ञानेश्वरी देवळावर लिहिली—निवृत्तीच्या आज्ञेनें सचोपंताकरवीं तेवढ्याच वेळांत लेखणीनें कागदावर लिहविली. रामदेव राजा-कडून परत आल्यावर एक महिना पुनः लेखन केलें. नंतर कोळशाचा लेखा पुसला गेला. ही हकीकत चमत्कारमय आहे. ( २१ ) नेवाशाहून आळंदीस आले; पण आजोळचा उल्लेख नाहीं. आळंदीहून चांगदेवाचा उद्धार होतांच पंढरपूरला नामदेवाच्या भेटीस गेल्याचा उल्लेख ( १६८ ). ( २२ ) पंढरपुरास चोखा मेळा, गोरा, कबीर, सांवता, परसा भागवत, नरहरी यांच्या भेटीचा उल्लेख आहे. परंतु यांतील कबीर नंतरचा असल्यानें सर्वांच्याच काळाची तपासणी झाली पाहिजे. ( २३ ) तीर्थावळीचा उल्लेख याच पंढरपूरभेटींत आला आहे. पण नामदेव तींत आला नाहीं ( १६९ – १७३ ). ( २४ ) पंढरपुरास बंका महाराचें वृत्तिपरिवर्तन करून दाखवून ब्राह्मणाचें खंडन केल्याची कथा नवीन आहे ( १७४–१९० ). ( २५ ) शेवटच्या निरोपांत हरिपाठ, हरिनामस्मरण व विठ्ठलदर्शन यांचा उपदेश बराच लांबविला आहे. तसा कांहीं उपदेश ज्ञानदेवांनीं केल्याचें आढळत नाहीं. ( २६ ) समाधिप्रवेशाचें सविस्तर वर्णन केलेलेंच नाहीं. अनेकांनीं तें अद्भुतरसभरित केलें आहे. ( २७ ) कवित्वाचा काळ वैशाख कृ. ७ मंगळवार शक १६९२ स्थळ-ब्रह्मपूर. ( २८ ) चारही भावंडांचीं समाधिस्थानें

सांगत असतां मुक्ताबाईचें 'ब्रह्मगिरीमधीं । मुक्ताबाई' (२२६) असें जें म्हटलें आहे तें लक्ष्य होय. कारण एदलाबादेजवळ मुक्ताबाई अन्तर्धान पावल्याची कथा सर्वत्र रूढ आहे. ब्रह्मगिरी त्र्यंबकपर्वतास म्हणतात. (२९) 'देखोनी समाधी । सर्व सुरवरी । इंद्रायणीतिरीं । वास केला' असें तुका विप्र म्हणतात. परंतु आळंदीचें माहात्म्य वर्णन करीत असतां तिच्या प्राचीन माहात्म्याचें मोठें सुरस वर्णन आढळतें. इंद्रायणींत इन्द्रानें तप करून इन्द्रपद पुनः मिळविल्याची व इतर अनेक कथा असून ज्ञानदेवापूर्वीच येथील तीर्थक्षेत्रांत अनेक देवतांचा वास होता असें वर्णिलें आहे. (३०) यजान( अज्ञान ) वृक्षाची कथा दिली आहे ती अशी : 'अज्ञान रोविला । दंड तो द्वारेसी । पल्लव तयासी । अज्ञोणीयां' (२३१) (३१) तुका विप्र नित्य कीर्तन करीत. श. १६९१ च्या कीर्तनवहींत तत्पूर्वी १४ वर्षे त्यांचा हा क्रम अव्याहत चालू होता असें दिलें आहे. कीर्तनाच्या आख्यानांत श्रोत्यांच्या मनरंजनासाठीं अद्भुत चमत्कारांची भर घालण्यांत आपण कांहीं विशेष करीत आहोंत असें त्यांस वाटत नसतें. सत्यासत्याची त्यांची व्याख्या बरीच लवचीक दिसते. त्यामुळेंच संतचरित्रांची विश्वसनीयता नष्ट झाली आहे (कीर्तनसंप्रदायामुळें). (३२) तुका विप्रांच्या गुरुपरंपरेबद्दल श्री. नारायणराव विप्रांनीं दिलेली माहिती विचारांत घेण्यासारखी आहे. ती त्यांनीं तुका विप्रांच्याच उल्लेखावर आधारलेली अशी दिली आहे. शिष्यपरंपरेनें तुका विप्र एकनाथांना 'नाता नातू होये' असें म्हणतात. इतरत्र अनेक ठिकाणीं एकनाथ–अनंत–विठ्ठल– विश्वनाथ अशी परंपरा दिलेली आहे. अनंत–विठ्ठल–विप्रनाथ हीच परंपरा बरोबर असून विश्वनाथ हें अनंत किंवा विठ्ठल यांपैकीं कोणाचें तरी दुसरें नांव असावें असा ते निर्वाळा देतात.

---

# ६. अज्ञानसिद्ध कवीची अप्रकाशित काव्यरचना पृच्छापत्र

( डॉ. व. वि. पारखे, डोंबिवली )

शक १३०० ते १३५० च्या सुमारास बालाघाट जिल्ह्यांत नागनाथ या नांवाचे सत्पुरुष होऊन गेले. अज्ञानसिद्ध आणि बहिरा पिसा हे दोन त्यांचे प्रमुख शिष्य होते. नागेश हे निसंग निर्विकार मुक्तपणाची राहणी असलेले एक थोर संत असून त्यांच्या ठायीं शुद्धाशुद्धादि सकल भेदभाव लयास गेले होते आणि त्यांना अलौकिक ब्रह्मस्थिति प्राप्त झाली होती, अशी माहिती श्री. ल. रा. पांगारकर आपणांस देतात.[1] धुळें येथें

---

१. मराठी वाङमयाचा इतिहास दुसरा खंड. लेखक श्री. ल. रा. पांगारकर; पृष्ठ २७.

श्रीसमर्थ वाग्देवता मंदिरांत असलेल्या एका बाडांत अज्ञानसिद्ध नागनाथकृत 'वासुदेव' नांवाचें एक हस्तलिखित आढळतें. त्यांत एके ठिकाणीं कवि म्हणतो[२]—

संत गुरु नागनाथु सिद्ध अज्ञान ज्ञाता ॥ अनंते कृपा केली कीर्ति काये वर्णू आता ॥
या उल्लेखामुळें श्री. पांगारकरांनीं नागेशाच्या संतपणाविषयीं दिलेल्या माहितीस पुष्टीच मिळते.

महाराष्ट्रसारस्वतांत' वडवाळसिद्ध नागेश आणि अज्ञानसिद्ध नागेश हे दोन स्वतंत्र कवि असल्याचें विधान डॉ. शं. गो. तुळपुळे करतात.[३] परंतु श्री. ल. रा. पांगारकर मात्र 'नागनाथ नागेश, वडवाळ नागेश, सिद्धलिंग, सिद्धराज हीं नांवें एकाच पुरुषाचीं असून, तो अज्ञान कवीचा गुरु होता,' असें सांगतात.[४] श्री. गो. का. चांदोरकर यांना, वरद नागेश आणि अज्ञानसिद्ध कवि एकच व्यक्ति असावी असें वाटतें![५] अज्ञानसिद्ध कवि श्रीगुरु म्हणून नागनाथ अथवा नागेशाचें नांव ठिकठिकाणीं देतांना आढळतो,[६] त्यामुळें या वादास अर्थ उरत नाहीं!

अज्ञानसिद्ध कवीच्या नांवावर महाराष्ट्र सारस्वतांत, 'गुरुशिष्यसंवाद' 'कालज्ञान,' व 'पंचीकरण' या ग्रंथांचा उल्लेख आढळतो. श्रीरामदासी संशोधनाच्या दोन खंडांत, 'वासुदेव', 'संकटहरिणी शिवग्रंथ,' आणि 'वरदनागेश' ही ग्रंथरचना नमूद केलेली आढळते. या व्यतिरिक्त पदपदांतरांचाहि उल्लेख केलेला दिसतो. श्री. गो. का. चांदोरकर केवळ 'कालज्ञान' आणि अविंध भाषेतील 'पंचीकरणाचा' उल्लेख करतांना दिसतात!

डॉ. पंडित आवळीकर यांनीं 'जुनें वाङ्मय नवें संशोधन' या संशोधनलेखसंग्रहांत अज्ञानसिद्धावरील विवेचक लेखांत अज्ञानसिद्धाविषयींचे अनेक अपसमज दूर करून त्याच्या 'तत्त्वबोध', 'जीवब्रह्मभेदलक्षण' 'पृच्छापत्र' आणि 'काळज्ञान' या चार ग्रंथांचा परिचय घडविला आहे. तसेंच डॉ यू. म. पठाण यांच्या 'नागेशसंप्रदाया'चें परीक्षण करतांना श्री. रा. चिं. ढेरे यांनीं 'इंद्रायणी' मासिकांत 'अकालज्ञाना'चा निर्देश केला आहे.

---

२. श्री रामदासी संशोधन, प्रथम खंड, पान ३१४, क्रमांक ३७६.
३. महाराष्ट्र सारस्वत ( चतुर्थावृत्ति ), पान ९२०.
४. मराठी वाङ्मयाचा इतिहास, दुसरा खंड, पान २७.
५. संत-कवि-काव्य सूचि पान ८.
६. श्री रामदासी संशोधन, प्रथम खंड, पान ३१४, क्र. ३७६; द्वितीय खंड, पान २३३, क्र. १०७४; पान २७४, क्र. ११९७; पान ३६७, क्र. १४२१; तसेंच मराठी वाङ्मयाचा इतिहास ( पांगारकर ) २ रा खंड, पान २६; इत्यादि पाहावे.

'पृच्छापत्रांत' अज्ञानसिद्ध कवि आपल्या गुरूची थोरवी वर्णन करतांना म्हणतो–

ऐसा वडवाळसिद्ध नागेश पूर्ण। गुरुसिष्य निर्द्वंद्व अनुभवे करून ॥ तेथे सिष अज्ञान ज्ञानरहित जाण। विज्ञान पूर्णापूर्णत्व सहज ॥ २०१ ॥

त्याचप्रमाणें 'अकालज्ञान' या काव्यरचनेंत कवि आपल्या गुरूस नमन करतांना म्हणतो–

नमो नमो जी नागदेवा। नमो नमो पूर्णात्मा पूर्ण भावा ॥ नमो देवाधिदेवा ॥ नागेश्वरा ॥ १०० ॥

संपूर्ण सदा नागेशू ॥ संपूर्ण संपूर्ण प्रकाशू ॥ संपूर्ण निजवासू ॥ अखंडित ॥१०२॥

या उल्लेखांवरून 'पृच्छापत्र' आणि 'अकालज्ञान' ही काव्यरचना अज्ञानसिद्ध या एकाच कवीची असावी यांत शंका वाटत नाहीं !

प्रस्तुत 'पृच्छापत्र' ही अज्ञानसिद्धाची काव्यरचना प्रसिद्ध केली जात आहे.

'पृच्छापत्र' ही २०१ ओव्यांची अध्यात्मपर काव्यरचना असून ती प्रश्नोत्तरस्वरूपांत गुंफिलेली आहे. शिष्य गुरूला प्रश्न विचारतो आणि गुरु शिष्याचें शंकानिरसन करतो, अशी या काव्याची धाटणी आहे. शब्दब्रह्म म्हणजे काय ? चिदाचें लक्षण कोणतें ? आनंदपुरुष कसा असतो ? अक्षर म्हणजे कोण ? जो क्षर तो कसा क्षरला ? चैतन्यब्रह्मीं पुरुषपण आहे काय ? निर्गुण ब्रह्म म्हणजे काय ? ईश्वरी जीवात्मा आहे किंवा नाहीं ? परब्रह्मीं कर्मत्रय कसें राहतें ? निराकार कसा प्रकाशतो ? इत्यादि. वेदांतपर प्रश्नांची चर्चा या काव्यरचनेंत अज्ञानसिद्ध कवीनें केलेली आहे. मात्र ही चर्चा करीत असतांना कवीनें भगवद्गीतेचा आणि शंकराचार्यांच्या मायावादाचा आधार प्रामुख्यानें घेतलेला दिसतो. उदाहरणार्थ, कवि म्हणतो–

विकारमाया अविद्येचा चराचरी। हे दोन्ही भेद गिते माझारी ॥ निरोपिले ॥ २८॥

अथवा असती अनुवादले श्रीकृष्णनायक। भगवद्गीते तेरावे अध्याई ॥ ३२ ॥

किंवा म्हणोन स्वमुखें सांगत। भगवद्गीते सातवे अध्याई ॥ ९२ ॥

श्रीशंकराचार्यांच्या 'मायाविवर्त' कल्पनेचा आधार घेत कवि म्हणतो—

सत्यवीण असत्य नाही। हे तव सहज उपपती ( त्ति ) पाही ॥

म्हणोनि सद्ब्रह्म सत्यचि माया तद्वीवर्त हेही। अनूभवी नित्यानित्य ॥ १६ ॥

ग्रंथ जरी अध्यात्मप्रवण असला तरी, वाळवंटांत आढळणाऱ्या ओयासीसप्रमाणें यांत काव्यदृष्ट्या कांहीं सरस रचना आढळते. कवि अज्ञानसिद्ध अनेक ठिकाणीं अनुप्रासात्मक रचना करतांना आढळतो. उदा०

---

१ पृच्छापत्र– भा. इ. सं. मं. हस्तलिखित क्रमांक २९।४३४.

जे सर्वत्र वर्तता सर्वत्रपूर्ण । जे अचळ अनामय अविनाश खुण ॥
पाहे पाहाणेवीण ते ॥ १३ ॥

अथवा–तरि पूर्ण ते पूर्णापूर्ण अपूर्ण अगम्यता ॥ ६४ ॥

अज्ञानसिद्धानें कांहीं ठिकाणीं दिलेले दृष्टान्तही सुंदर आहेत. उदा०--

तव मुमुक्षु चकोर चंद्रनिर्लांछन । नित्य संप्रज्ञात बोधसमाधी विहीन ॥
आपते स्नेहाळ लडिवाळ भाव ऐकोन । बोलता जाला ॥ ६ ॥

तसेंच–मुखी घालिता शर्करा कवळ ॥ सर्वांगी स्वादाचा सुकाळ ॥
तैसा स्वानंद कल्लोळी इंद्रियाचा मेळ । विकळ ते स्वानंद सुखे ॥ २१ ॥

किंवा–चित्रीचा व्याघ्र लागे स्वप्नावस्था पाटी । हे तद्द्रष्ट्या सत्यमान गोष्टी ॥
तैसी दंपत्य ही कोटी न साहे ब्रह्मी ॥ ६१ ॥

अथवा–तम अंधकारी ज्ञानदीप उजळिला ॥ तै अंधकार प्रकाशरूप संचला ॥
तैसा जिवित्व निराशा पावला ॥ ऐश्वर्यत्व ॥ ७२ ॥

या दृष्टान्ताच्या बरोबरच आपणांस कांहीं सुंदर उत्प्रेक्षाहि कवीनें रचिलेल्या आढळतात. उदाहरणार्थ—

का कामिनीसंगे कामिक सुखाची प्राप्ती । ते त्यजून नैश्वर्य भोगाची सुखोत्पत्ती ।
तेची तुर्या कामिनीसंगे अखंड सुख भोगिती । ते स्वानंद सुख ॥ २२ ॥

का रसे सुखावे रसना । ते त्यजोनी विषयाची वासना ॥
अर्धमात्रा ब्रह्मरसे समरस मना । निर्मने भोगी ते स्वानंद सुख ॥ २३ ॥

अज्ञानसिद्ध कवीच्या या हस्तलिखितांत कांहीं ठिकाणीं अक्षरें गळलेलीं आढळतात अथवा चुकीचीं शब्दरूपें येतांना दिसतात. उदा० अपत्यसाठीं 'आपत' किंवा ब्रह्म हा शब्द 'ब्रंह्म' असा लिहिलेला आढळतो. कदाचित् कवीचा हा दोष नसून नकलकाराचा तो असावा, असें वाटतें. या हस्तलिखिताचा नकलकार भानजी त्रिंबक हा असून तो मोहोळ येथील राहणारा. शके १७९३ प्रजापति नाम संवत्सरीं त्यानें अज्ञानसिद्ध कवीच्या 'पृच्छापत्रा'ची नकल स्वतःसाठीं केलेली आहे. अज्ञानसिद्ध कवीच्या या काव्यांतील ओवीची रचनाहि चमत्कारिक आढळते. कांहीं ठिकाणीं ३ चरणच आढळतात. उदा० ६१ वी ओवी पाहावी. तसेंच, या ओव्यांच्या चरणांची लांबीहि फार आढळते. जणूं कांहीं गद्यसदृश वाक्येंच! त्याचप्रमाणें ओवीचा चतुर्थ चरण कांहीं ठिकाणीं छोटा ( उदा० ७२ ) तर कांहीं ठिकाणीं लांबलचक असलेला दिसतो ( उदा० ७, १४, २३ वगैरे ).

अज्ञानसिद्धाच्या रचनेची वाचकांना ओळख व्हावी म्हणून 'पृच्छापत्र' हा काव्यग्रंथ आम्ही या अंकांत प्रसिद्ध करीत आहोंत. त्याचा 'अकाळज्ञान' हा ग्रंथहि प्रसिद्ध करण्याचा मानस आहे. अज्ञानसिद्धाचे हे दोन अप्रकाशित 'काव्यग्रंथ' अभ्यासार्थ उपलब्ध करून दिल्याबद्दल आम्ही प्रा. ग. ह. खरे, कार्यवाह, भा. इ. सं. मंडळ, पुणें यांचे ऋणी आहोंत.

---

# पृच्छापत्र–मूळ पाठ

श्रीगणेशाय नमः ॥ पृच्छापत्र ग्रंथ प्रारंभः ॥ ॐ नमो सद्गुरू वोंकार मायामह तत्त्वाचा मुळी ॥ ॐ नमो सद्गुरू गुणसाम्य संकेता जवळी ॥ ॐ नमो सद्गुरु सच्चीदानंद कलोळी ॥ विरहीत सहजा ॥ १ ॥ ॐ नमो सद्गुरू अनंदघन अपरमिता ॥ ॐ नमो सद्गुरू त्रिगुणात्मक बंधन विध्वंसिता ॥ ॐ नमो सद्गुरूनाथा पंथ बुझाविता ॥ ज्ञयज्ञान ग्रासिता विज्ञानत्वे ॥ २ ॥ तू तव निशब्दपणे शाश्वत ॥ परि अनाथा कारणे वेळाइत ॥ कर्तृत्वा नातळता बुझावित ॥ मुमुक्षाते ॥ ३ ॥ तू ऐश्वर्य संपूर्ण परमांमृतेसी ॥ प्रस्नोत्तर दहकाते निवारिसि ॥ म्हणोनि अज्ञानसित्ध नागेशी ॥ निज प्रेमेसी विनवणी ॥ ४ ॥ जी पृछापत्र पाटविले राजचंद्रे ॥ तरी तुवा विज्ञानस्थिती योगेंद्रे ॥ सिष्यवृंद निववोनि सुखेंद्रे ॥ स्वसुखे निववीजे ॥ ५ ॥ तव मुमुक्षु चकोरचंद्र निर्लांछन ॥ नित्य संप्रज्ञात बोधसमाधी विहिन ॥ आपते श्रेहाळ लडिवाळ भाव ऐकोन ॥ बोलता जाला ॥ ६ ॥ बोधाचा करोनि ग्रास ॥ समाधीस देवोनि त्रास ॥ अश्रमाभिमानी उदास ॥ तो नागेश म्हणे वद सिषा ॥ ७ ॥ मग निज चरणी ठेवोनि मन ॥ वदे सिष अज्ञान ॥ सच्चीदानंद पद व्याख्यान ॥ हे विपद ज्ञान सांगिजे जी ॥ ८ ॥ सच्चीदानंद पद ॥ हा तव वेदीचा शब्द ॥ याचे निरसोनि त्रै भेद ॥ ज्ञान विशुद्ध निरोपावे ॥ ९ ॥ पृछापत्र ते वचन ॥ शब्द ब्रह्म ते कवण ॥ चिदाचे काय लक्षण ॥ आनंद पुरुष तो कैसेन निर्धारे अह्मा ॥ १० ॥ मग निशब्दवादे शब्दगती चेवउन ॥ बोले भवभयश्रम विध्वंसन ॥ सद्ब्रंह्मपदनिर्वाण ॥ परब्रंह्म ते ॥ ११ ॥ दिवस निशा भ्रमण होत जात ॥ तया माजि शाश्वत ते सहजसत ॥ ते शब्द ब्रह्म अविकृत ॥ जाण नित्यानित्य स्वयंभ ॥ १२ ॥ जे अस्तितव सत्ता मात्र स्वानंदघन ॥ जे सर्वत्र वर्तता सर्वत्रपूर्ण ॥ जे अचळ अनामय अविनाश खुण ॥ पाहे पाहाणेवीण ते ॥ १३ ॥ जया स्वरूपामाजि कैसी कोठे किती ॥ ब्रह्मांडे कवणीकडे अहेत म्हणोनि नेणती ॥ ते स्वरूप अंगांगत्व पूर्णस्थिती ॥ सद्गुरु खुणे निश्चिति पाहे या पाहणे ॥ १४ ॥ ऐसे सत्पद ब्रह्म साचेची ॥ द्वैत मिथ्या हे अज्ञा वेदाचीं ॥ तरी चित्पदमाया तद्वीवर्त हें सांगणेची ॥ न लगे अनुभविका ॥ १५ ॥ सत्यावीण असत्य नाही ॥ हे तव सहज उपपती पाही ॥ म्हणोनि सद्ब्रह्म सत्यचि मायातद्वीवर्त हे ही । अनूभवी नित्यानित्य ॥ १६ ॥ आतां अनंद पुरुषाचे लक्षण ॥ ते विवेकदृष्टान्ते सांगेन खुण ॥ दोही अंतरी सर्वेश्वर पूर्ण ॥ प्रकाशवंत ॥ १७ ॥ आपणापासी वस्तू असे नैश्वर नीच ॥ आणि दुसरी लाधे अनैश्वर साच ॥ तरि अनंद वाटे सहजच ॥ प्रसित्ध दिशे ॥ १८ ॥ म्हणोनि चिद्रूपमाया निरसिता ॥ आणि सद्रूप अनुभवे अनुभविता ॥ दोही अंतरी अनंद प्रकासिता ॥ तो स्वानंद निर्धारू ॥ १९ ॥ कवण ऐसे म्हणेल ॥ जे स्वरूप अनुभवो सांगो यईल ॥ परि अनंद सुख कैसे असेल ॥ अनुभवसित्ध नागेश ॥ २० ॥ मुखी घालिता शर्करा कवळ ॥ सर्वांगी स्वादाचा सुकाळ ॥ तैसा स्वानंद कल्लोळी ॥ इंद्रियाचा मेळ ॥ विकळ ते स्वानंद सुखे ॥ २१ ॥

का कामिनीसंगे कामिक सुखाची प्राप्ती ॥ ते त्यजून नैश्वर भोगाची सुखोत्पती ॥ तेंची तुर्या कामिनीसंगे अखंड सुख भोगिती ॥ ते स्वानंदसुख ॥ २२ ॥ का रसें सुखावे रसना ॥ ते त्यजोनी विषयत्वाची वासना ॥ अर्ध मात्रा ब्रह्मरसे समरस मना ॥ निर्मने भोगी ते स्वानंदसुख ॥ २३ ॥ येवं सच्चीदानंदपद व्यान ॥ अद्वयभेदे भिन्न ॥ हे निरसोनि उन्मन ॥ स्वस्थ संप्रज्ञ स्थिती ऐके ॥ २४ ॥ जेथे नातले द्वंद्वाचे स्फुर्ण ॥ गिळिला येकपणाचा अभिमान ॥ तेथे अनंद ग्रासिला जाण ॥ सहज जेथिचा तेथे ॥ २५ ॥ एवं सच्चीदानंद पदभेद ॥ हे मिथ्या अनुभव गतीते निर्द्वंद्व ॥ यदर्थी वेदांत वचन साक्षी उपनिषद ॥ सित्धांत अनुभव शब्द निशब्द ते जाणोनी नेणे ॥ २६ ॥ हे वेदांत सित्धांत अप्रमाण ॥ म्हणती तयाही न विवेकियाचें खंडज्ञान ॥ तया पाषांडमत्ते दूषण ॥ तयाचे तया भोगवी ॥ २७ ॥ ऐसे सच्चीदानंद पदत्रयांमृत ॥ करोनि येकार्णव सहज दृष्टांत ॥ मग सिष्य होवोनि संप्रज्ञात ॥ असें उत्धारिता पृछापत्र ॥ २८ ॥ जी कैवल्यनिधी गुणसागरा ॥ निरसिले सच्चीदानंदपद श्रमोत्तरा ॥ आंता क्षराक्षर विचार करा ॥ सद्‌गुरु माहेरा अनाथाचिया ॥ २९ ॥ पत्रवचन अक्षर कवण तो सचंला ॥ क्षर कैसा क्षरला ॥ या दोहीचा विचार भला ॥ होय ते सांगा ॥ ३० ॥ उत्तर ॥ मग सकोमळ सप्रेम भाव देखोनि भाव तत्पर ॥ बोले पूर्णबोधसद्‌गुरु उदार ॥ म्हणे अक्षई चैतन्यावभास ते अक्षर ॥ तया करस्थापर ते परमस्वरूप ॥ ३१ ॥ तथोनि त्रिगुणात्मक आणि पंचभूतात्मक ॥ हे क्षर जे क्षरले सकळिक ॥ असती अनुवादले श्रीकृष्णनायक ॥ भगवद्गीते तेरावे अध्याई ॥ ३२ ॥ हा क्षराक्षर विचारू ॥ वाचकगती अंधकारू ॥ मग कृपा करोनि सद्‌गुरु ॥ करी निर्धारू अनुभवे ॥ ३३ ॥ क्षराचे कारण अक्षर ॥ अक्षर करस्थ वस्तूपर ॥ ऐसा अनुभवे निर्धार ॥ करोनि बुझाविला ॥ ३४ ॥ पुनरपी सिष करी विनंती ॥ जे अशंका पृछापत्रीं ॥ ती ऐका जी निश्चिती ॥ सद्‌गुरूराया ॥ ३५ ॥ पत्रावचन ॥ तिजा पुरुष तो करण ॥ याचे सांगितले पाहिजे लक्षण ॥ चैतन्य ब्रह्मो पुरुषपण ॥ असे की नसे ॥ ३६ ॥ उत्तर ॥ मग बोले विज्ञानसिंधू सिरोमणी ॥ पूर्ण सर्वारंभपूर्णपणी ॥ प्रस्नोत्तरासि सादर होउनी ॥ निरोपिता जाला ॥ ३७ ॥ म्हणे तिजा पुरुष तो उन्मेशु ॥ जो गुण साम्य संकेती सहवासु ॥ उन्मेशा निराभासु ॥ पुरातन वस्तू ॥ ३८ ॥ चैतन्यब्रह्मी पुरुषपण ॥ असे की नसे हे वचन ॥ अनुभवे करितसे खंडण ॥ गुरूराज ॥ ३९ ॥ षडदर्शनासि बुझाविता ॥ कृपा उपजली तया श्रीगुरूनाथा ॥ म्हणे चैतन्य ब्रह्मी अस्तीत्व पुरुषत्वा ॥ हे काय सांगणे नलगे ॥ ४० ॥ हे अष्टधा प्रकृतीप्रपंच सकळिक ॥ सकळ ऐश्वर्यचैतन्य कारणिक । म्हणोनि मुळीच सत्ता पुरुषत्व असे देख ॥ हे संशयात्मक जनासी ॥ ४१ ॥ जरी परसमंधे चैतंन्नी नाही पुरुषत्व सकळिक ॥ तरी पुरुषत्वा नाही स्थानक ॥ चैतन्या परते पुरुष ना नपुसक ॥ अद्वयात्मक अजत्वे ॥ ४२ ॥ ऐसे ऐकोनि निरोपण ॥ सिव विनवी संप्रज्ञ ॥ म्हणे सगुण निर्गुण लक्षण ॥ हे पृछापत्र वचन प्रभु निरसावे ॥ ४३ ॥ पत्रवचन ॥ निर्गुण ब्रह्म ते कवण ॥ याचे कीजे निरोपण ॥ सगुणाचे कैसे लक्षण ॥

तेही सांगावे ॥ ४४ ॥ उत्तर ॥ मग देखोनि खंडज्ञा। सद्ज्ञानी ॥ अनुभवसिध्द न भीत चित्ती ॥ विदारी निशस्रपणे भ्रांती ॥ प्रश्न वचनाची ॥ ४५ ॥ निर्गुण ब्रह्म ते सत्पदत्व ॥ तयाचे लक्षण कैसे हे भेदत्व ॥ हे परिसत जिही दास्यत्व ॥ केले असेल सद्गुरूचे ॥ ४६ ॥ तरी निर्गुणाची गती ॥ ते प्रगटेना गुप्त स्थिती ॥ आहे नाहीं म्हणती श्रुती ॥ टकोनि टेलिया ॥ ४७ ॥ जे सर्वकाळ नित्यानंद भरित ॥ अदृस्यरूपे आत्मासमीप नित्य ॥ जैसा मीन उदकी वर्तत ॥ तैसी सगुण ब्रह्मांडे निर्गुण ब्रह्मी ॥ ४८ ॥ अता सगुणाचे लक्षण ॥ ते तव अष्टधा प्रकृती भेदभिन्न ॥ अविद्या प्रपंचभेदत्रयकार्य माया कारण ॥ हे भगवद्गीते भगवान वदे सातव्याध्याइ ॥ ४९ ॥ ऐसे सगुण निर्गुण भेदत्व गती ॥ निरसोनि राहिले पूर्ण स्थिती ॥ त्याचिये सांप्रदाई अधिकारिये होती ॥ ते पावती हे स्थितीते ॥ ५० ॥ ऐसे जाणोनिया चिती ॥ सुख पावोनिया अनुभव गती ॥ पुनरपी सिष करी विनंती ॥ पृछापत्री जे अशंका ॥ ५१ ॥ पत्रवचन ॥ इश्वरी माया जाली ॥ ते दुहिता गमो अली ॥ आणि प्रकृती पुरुष गमली ॥ कोणे न्याये ॥ ५२ ॥ जरी अकस्मात जाली दोनी ॥ तरि तो बंधू ते भगिनी ॥ ते माता जरी ती पासुनी ॥ तो देव केवी घडे ॥ ५३ ॥ होणे नाही दुजे स्थान ॥ तरी ते दंपत्य कैसेन ॥ दोही मातृकाचे प्रमाण केले कैसे ॥ ५४ ॥ उतर ॥ ईश्वर मायेचे विवरण ॥ आणि प्रकृती पुरुषाचे लक्षण ॥ दुहिता माता बंधू भगिनी दंपत्य हे वचन ॥ भ्रम निरसू परियस ॥ ५५ ॥ अविद्या कार्य अष्टधा प्रकृती भेदत्व ॥ कार्यकारण कर्तृत्व ॥ तया अधिष्टाणे जिवात्मया पुरुषत्व ॥ परिस अभेदत्वे ॥ ५६ ॥ तत्वता जाणोनि दृष्टान्त ॥ अनात्मजात श्रुती निरसत ॥ तेथे प्रकृती पुरुषाचि नास्तित्व ॥ मायबंधूभगिनित्व राहे कोटे ॥ ५७ ॥ मग तया ऐश्वर्य कारण ईश्वरी ईश्वरत्व ॥ तोही शुध्द सत्वात्मक भोग द्वैत ना म्हणत ॥ तेणे इह नानास्तिकिंचन हे श्रुति वाक्य सत्य ॥ मानिती अनुभव ज्ञानी ॥ ५८ ॥ जेथे अनाजात श्रुतिशब्द निरसिले ॥ अद्वैत एकमेव सर्व अनुभविले ॥ तो अनुभवही जे टाई विरेल ॥ तेथे अटले ईश्वरमायेसहित ॥ ५९ ॥ तेथे दुहिता माता पाहता ॥ बंधू भगिनीत्व अथवा पिता ॥ ही आशंका कळंक आदि गभस्तीसि लाविता ॥ जै सूर्य मृगजळी बुडता ॥ तरि हे न घडेल ॥ ६० ॥ चित्रीचा व्याघ्र लागे स्वप्नावस्थापाटी ॥ हे तद्दृष्टया सत्य मानी गोष्टी ॥ तैसी दंपत्य ही कोटी न साहे ब्रह्मी ॥ ६१ ॥ तरि तया नसोनि तयेसि सहवास ॥ भोग भोगोनि अभोक्ता उदास ॥ हा ही निरसे कळंक लेश ॥ जैसा स्वप्नभया पासाव सावकाश ॥ होवोनि राहे जाग्रती ॥ ६२ ॥ साकार माया अविद्या वनस्पती ॥ वसंतरात सत्ता वोलावनी ॥ त्याची सहकुटुंब उत्पत्तिस्थिति ॥ केवी निराकार वसंती अतळे ॥ ६३ ॥ परब्रह्म सत्य पूर्ण तत्वता ॥ तरि दुजे असावेश कोटे होती अपूर्णता ॥ तरि पूर्ण ते पूर्णापूर्ण अपूर्ण अगम्यता ॥ अपूर्णता ते शब्दचातुर्यताज्ञान उरे ॥ ६४ ॥ तरि ते नाते दोनी नाटकपण ॥ तेथे कवणासि काय होय कवण ॥ येणे सिधांते तर्कमुद्रेचे खंडण ॥ करी अनुभव न्याये ॥ ६५ ॥ ऐसे ईश्वर माया प्रकृती पुरुष उगलवण ॥ करूनि सांगीतले अनुभविका ब्रह्मपूर्ण ॥ येरा हतभाग्या असतचि

न दिशे जाण ॥ अंधा सूर्य जैसा ॥ ६६ ॥ तव स्वानुभवे सुखी होउनी ॥ पुनरपी पृछापत्र उत्थाऊनी ॥ इश्वरी जिवात्मा अहे की नाही ·हा निर्णय करोनी ॥ सांगा म्हणे सिष्य ॥ ६७ ॥ पत्रवचन ॥ इश्वरी जिवात्मा अहे की नाही ॥ अथवा असे की नसे परब्रम्ही ही ॥ कर्मत्रय कैसे वसे परब्रह्मी ॥ ते सांगा स्वामी ॥ ६८ ॥ उत्तर ॥ मग बोले अज्ञान दृस्यकुठारदहक ॥ अविद्योपाधी बोलिजे जीवतर्के ॥ तद्रूप्या जिवित्वकळंक ॥ केवि लागे ॥ ६९ ॥ आविद्योपाधो जीव ॥ मायोपाधी शीव ॥ या दोहीचा उगव ॥ करिती अनुभवी वेदांत ज्ञानी ॥ ७० ॥ सकळ जीवाचे ईश्वरत्व ॥ म्हणोनि नाम ईश्वरत्व ॥ तरी ईश्वरी वर्ते जिवित्व ॥ ऐश्वर्यत्वे ॥ ७१ ॥ तम अंधकारी ज्ञानदीप उजळिला ॥ तै अंधकार प्रकाशरूप संचला ॥ तैसा जिवित्व निराश पावला ॥ ऐश्वर्यत्व ॥ ७२ ॥ ऐसा अंधकारी प्रकाश थोर ॥ की प्रकासी अंधकार ॥ तैसा इश्वरी जिवात्मयाचा विचार ॥ माया अविद्या संबंधे विस्तार उपाधीवशे ॥ ७३ ॥ अज्ञानाते निरसी ज्ञान ॥ ज्ञानाते निरसी विज्ञान ॥ तेथे नाही जीव इश्वरपण ॥ ब्रह्म पूर्ण पूर्णत्वे ॥ ७४ ॥ जीवत्व ईश्वरत्व नलगे वस्तूसी ॥ तेथे त्रिविध कर्मासी वस्ती कैसी ॥ या पृच्छापत्र वचनासी ॥ पारहार परि तो ॥ ७५ ॥ जेथे अविद्या माया नातळती ॥ तेथे त्रिविध कर्मासि कैची अस्ती गती ॥ तरी या सकळ प्रपंचासि ब्रह्मी वस्ती ॥ जैसे मृगजळ दिनकरी ॥ ७६ ॥ पत्रवचन ॥ महद्त्रय अहंकार लक्षण ॥ साक्षात्कार होय कैसेन ॥ देवत्रय कोठुन ॥ रुपासि अले ॥ ७७ ॥ उत्तर ॥ महतत्व शुत्वसत्वात्मक माये पासुन ॥ तेचि महद् त्रय अहंकाचे स्थान ॥ उत्पती स्थिती हरा सलक्षण ॥ सत्व रज तम ॥ ७८ ॥ रूपमात्रासि रूपावया कारण ॥ अष्टधा प्रकृती मुख्य जाण ॥ या प्रकृती निरासे उरे अभिमान तेथे रुप कैचे ॥ ७९ ॥ ज्ञानांजन शुधार्थ पायाळ नैनी दाटे ॥ तै दृस्य महिमाजि अदृस्य भेटे ॥ तोही ज्ञानघन अभिमान जेथिचा तेथे आटे ॥ तै फिटे दृस्य भुरळे ॥ ८० ॥ ऐसे सद्गुरुचेनि कृपालेशे ॥ दृस्य सबाह्य अदृस्य प्रकाशे ॥ चतुर्थशून्य चैतन्यानुभव निरसे ॥ पूर्णत्वे पूर्ण ॥ ८१ ॥ तेथे प्रथम चारि दशा अनुभविता ॥ मध्यशून्य साक्षात्कार पाहता ॥ दिशे प्रकाश तत्वता ॥ महदत्रय अहंकाराच्या ॥८२॥ गौरशामकृष्ण ॥ हे सत्व रज तम जाण ॥ याचा साक्षात्कार गुरुवचन ॥ करी मध्य शून्य ॥ ८३ ॥ या विकल्प भ्रांती सकळिका ॥ दृस्य कळंक न लगे निष्कळंका ॥ पत्रवचन भ्रम निरसावया सिष्य टिळका ॥ वचनार्थ दाखविला ॥ ८४ ॥ ऐसा शब्दसंदेह निरसला ॥ तव सिष्य विनविता जाला ॥ पुन्हा उद्गार केला ॥ पत्र प्रश्नाचा ॥ ८५ ॥ पत्रवचन ॥ अकारा अले सर्वही नाशे ॥ निराकार कैसा प्रकाशे ॥ ज्ञयज्ञात विज्ञान कैसे ॥ सांगावे जी ॥८६॥ उत्तर ॥ अकारमात्र निरसे ॥ मग गुरुमुखे निराकार प्रकाशे ॥ तेव्हा सर्व नैश्वर ऐसे ॥ सहजचि कळे ॥ ८७ ॥ जो जो दृस्य पदार्थ जाणिजे ॥ तो तो ज्ञय ऐपे बोलिजे ॥ दृष्टा तो ज्ञाता सहज ॥ अनुसंधान धरिजे ते विज्ञान ॥ ८८ ॥ हे दृस्याचे ज्ञान सोडोनी ॥ अदृस्य अत्मा गुरुमुखे अनुभवोनी ॥ ते परमविज्ञानी ॥ लीन होती साधू

॥ ८९ ॥ जे अनुभवे अनुभवी पूर्ण ॥ तै ज्ञतोकळा जाय हरासोन ॥ तै ज्ञयज्ञाताज्ञान ॥ विज्ञानी समरसे ॥ ९० ॥ ऐसे परमनिर्वाणिक ॥ जाणो निरसले प्रस्नभेद कळंक ॥ तव सिष्य सद्गुरुचा बालक ॥ पुन्हा विनविता जाहाला ॥९१॥ पत्रवचन ॥ शबल शुद्धवाव्य लक्ष ॥ हा द्विधा वर्णपक्ष ॥ त्यजावा कोण प्रत्यक्ष ॥ कोण तो घेणे ॥९२॥ उत्तर ॥ संसार तमावरि अदित्य ॥ पूर्ण प्रभा सद्गुरु नित्य ॥ तो अशंका निरसावया उदीत ॥ विज्ञान सिंधू ॥९३॥ म्हणे सगुणत्व ब्रह्मांड-उपाधि शबल ॥ वाव्य जो वाचक गतीचा मेळ ॥ लक्ष जो लक्षत्व लक्षत्वा अळुमाळ ॥ युक्तीसि आणिती ॥ ९४ ॥ याचांश सोडोनि जिवाचा ॥ लक्षांश त्यजोनि ईश्वराचा ॥ शबलांश निरसोनि दस्याचा ॥ शुधांश वस्तूचा अनुभव घेईजे ॥ ९५ ॥ परब्रह्मी ज्ञेती निमग्न होता ॥ वाचा निवर्तलिया सर्वार्था ॥ तेथ शबल लक्ष पाहता ॥ सहजचि निरसले ॥ ९६ ॥ मग शुत्ध पदार्थी ॥ या सहजचि निरल्या भ्रांती ॥ हे जाणोनि सिष्य करी विनंती ॥ अनुभवराजयासी ॥ ९७ ॥ पत्रवचन ॥ पदद्वयाचे लक्षण ॥ कार्य आणि कारण ॥ भेदत्रयाचे निरोपण ॥ करावेजी ॥ ९८ ॥ उत्तर ॥ पदद्वयाचे निरोपण ॥ त्वंपदतत्पद जाण ॥ याचे कार्यकारण ॥ माया अविद्या ॥ ९९ ॥ अविद्योपाधी जिवात्मा त्वंपदपिंड ॥ याचे कारण मायोपाधी तत्पद इश्वर ब्रह्मांड ॥ भेद त्रयासि कारण महतत्व प्रचंड ॥ तयासि कारण शुत्ध माया ॥ १०० ॥ जेथे माया अविद्या वावो ॥ तेथें पदत्रया कैचा ठावो ॥ मग अखंडित ब्रह्मान्वयो ॥ पदभेदरहित ॥ १ ॥ त्वं पद तत्पदाचे ऐक्यत्व ॥ ते असिपद अनुभव ग्रासी पूर्णत्व ॥ हे निरसोनि प्रश्न भेदत्व ॥ पुन्हा सिष्य विनवी ॥ २ ॥ पत्रवचन ॥ ॐकारी औट मात्रा ॥ त्या सांगाव्या जी सर्वत्रा ॥ त्याचेही अर्थ पवित्रा ॥ प्रत्यक्ष दावा ॥ ३ ॥ कोठे प्रग(ट)ला वोंकार ॥ तेथे कैसे क्षराक्षर ॥ अर्थ मात्रुका विस्तार ॥ कैसा जाला ॥ ४ ॥ वेद कोटे जाहले ॥ नेति मुखे काय निरसिले ॥ पूर्ण देखिले ॥ कवणे ते वेद ॥ ५ ॥ उत्तर ॥ निर्वाण स्वरूपीची शुत्धसत्वमाया ॥ तयेपासूनीरे महतत्व सिष्यराया ॥ ॐकार औट-मात्रासहित प्रगटावया ॥ तेचि स्थान ॥ ६ ॥ प्रथम अकारू ॥ द्वितिय उकारू ॥ त्रितिय मकारू ॥ याचे ज्ञातृत्व निर्वाल ॥ तेचि अर्धमात्रा ॥ ७ ॥ ते ज्ञातृत्व अर्धमात्रा स्वरूपीं मुरे ॥ तेचि त्या अर्धपवित्राचे पवित्र वारे ॥ गुरुमुखे प्रत्यक्षाकार निर्धारे ॥ तै हे प्रश्न मिथ्या ॥ ८ ॥ नित्य स्वरूपी उन्मेश चैतंन्य स्फुर्ण ॥ ते आक्षर कुटस्थ जाण ॥ तेथोनि अष्टधा प्रकृतीसी कारण ॥ विस्तारले क्षर ॥ ९ ॥ या क्षरापासोनि अक्षरावरी ॥ अनान्मश्रुती नेति नेती उच्चारी ॥ तो उचारोनि निःशब्द निर्धारी ॥ तया निःशब्द पूर्ण ब्रह्माभीतरी बुडाले सर्व ॥ १० ॥ ऐसे निःशब्दी ॐकार शब्दगती ॥ तेथेचि प्रणवसहीत वेद वसती ॥ वेदा आस्तित्व शाद्बिका गती ॥ या सकळिका व्यक्ती अव्यक्ता होती परब्रह्मी ॥ ११ ॥ ऐसा निरोपिला वचनार्थ ॥ तव सिष आसे अ( अं )र्तभुत ॥ देह चतुष्ट्य ईश्वरी विशदार्थ ॥ निरोपिजे जी ॥१२॥ पत्रवचन ॥ वेद कोणे वस्तुमाजी ॥ काय निरसोनि दिधली बुडी ॥ देहे चतुष्ट्य ईश्वरी ॥ कैसे सांगा ॥ १३ ॥ उत्तर ॥ तव

संकल्पशनिःपाते व( वे )छिले या जिवाते ॥ उपचारिता ब्रह्मरस परमामृते ॥ कृपा उपजली निजपद दातियाते ॥ म्हणे परिस निजभक्ता ॥ १४ ॥ ब्रह्मी उन्मेशादि प्रपंच निर्सिता ॥ वाचा निवर्तलिया सर्वथा ॥ मग वेद मौने निशब्द तत्वता ॥ स्वरुपी बुडि देवोनि राहिला ॥ १५ ॥ आता ब्रह्मांडविश्वरूप ते इश्वराचे स्थुल शरीर ॥ तेथिची जागृतीते श्रृष्टी अवस्था निरंतर ॥ ब्रह्मा अभीमानी रजोगुणी षडविकार ॥ सृजित विश्व ॥ १६ ॥ हिरण्यगर्भ व्यवस्थाचक्र लिंगदेह इश्वरी ॥ स्थिती अवस्था ते स्वप्न अवधारी ॥ विष्णू आभिमानी सत्वगुण अधिकारी ॥ करी स्थिती व्यापार ॥ १७ ॥ कारण शरीर इश्वरी ते माया ॥ तथील श्रुशुप्ती अवस्था तो प्रळय रे सिषराया ॥ रुद्रतमोगुण अधिकारिया ॥ वर्ते तेथे ॥ १८ ॥ निजात्रती चैतन्यत्व साक्षित्व ज्ञातृत्व ॥ तें चि महाकारण देह आस्तित्व ॥ तेथे तुर्य अवस्था वर्ते ऐश्वर्यत्व ॥ अभिमानी प्रत्यगात्मा ॥ १९ ॥ ऐवं स्थूळ सुक्षम क्षम ) कारण महाकारण ऐश्वर्य ॥ हे इश्वराचे देह चतुष्टये ॥ चारी अवस्था चारि अभिमानिये ॥ निरोपिले वेदांतसाक्षी ॥ २० ॥ ऐसा निरसला प्रश्नेद ॥ तव सिष करी अनुवाद ॥ म्हणे परिसाजी पुन्हा शब्द ॥ पृच्छापत्रिचा ॥ २१ ॥ पत्रवचन ॥ देवासि कोण अधिद (दै) वत ॥ कोणासि म्हणिजे अधिभूत ॥ अध्यातम बोलिजेत ॥ कवण ते जी ॥ २२ ॥ उत्तर ॥ तव सद्गुरू बोलती सिषोत्तमा ॥ देवादेव आधि तो निजात्मा ॥ देवोदेवत नलगे परब्रह्मा ॥ तया अनुभवें प्रश्न भ्रमावेगळे होईजे ॥ २३ ॥ सकाळभूत-भूतासी ॥ प्रपंचादिकपिंड ब्रह्मांडासा ॥ अधिभुत ते परियसी ॥ शुत्धसत्वात्मक माया ॥ २४ ॥ ऐसे सद्गुरुने निरोपिले ॥ तव सिषे विनविले ॥ पृछापत्रीं जे बोलिले ॥ ते परिसा स्वामी ॥ २५ ॥ पत्रवचन ॥ विकार असे की नसे इश्वरी ॥ देव असती कोणे विकारी ॥ या जिवासि निर्धारी ॥ विकार कितीं ॥ २६ ॥ उत्तर ॥ तव सद्गुरू म्हणती अवधारी ॥ शुत्धज्ञानमायाविकार इश्वरी ॥ देवता त्रय उत्पती-स्थितिलय संव्हारी ॥ विकारवंत ॥ २७ ॥ जीव अविद्याविकारी ॥ येवं जीवादेवा अवधारी ॥ विकार माया अविद्येचा चराचरी ॥ हे दोन्ही भेद गितेमाझारी ॥ निरोपिले ॥ २८ ॥ जेथे अविद्यामाया निरसे ॥ तेथे जीवदेव विकार न दिसे ॥ अखंडित अविकारी असे ॥ निजात्मस्वरूप ॥ २९ ॥ ऐसे अनुभवीक निरोपण ॥ ऐकोनि सिष करी गुरूसि वंदन ॥ म्हणे परिसा जी वचन ॥ स्वामिराया ॥ ३० ॥ पत्रवचन ॥ कोणती अवस्था देवा ॥ किती अवस्था जिवा ॥ अवस्था निर्धार करावा ॥ वनस्पतीचा ॥ उत्तर ॥ तव म्हणे विज्ञान सिंधू ॥ परिसी जीवदेव अवस्थाभेदू ॥ तेणे तुटे सवशय (संशय) कंदू ॥ पृच्छापत्र वचनाचा ॥ ३२ ॥ ब्रह्मांडतत्साक्षित्वे पिंड वसे ॥ ते सप्तधातुकस्थूळ शरीर पारसे ॥ विष्णू आभिमानी जाग्रत अवस्था वसे ॥ नेत्रस्थानी ॥ ३३ ॥ अंतःकर्ण चतुष्टय देह सुक्षम ॥ तेथे अवस्थेचा भ्रम ॥ तैजस अभिमानी हे वर्म ॥ बुझे कंठस्थान त्याचे ॥ ३४ ॥ कारण देह अज्ञानपण ॥ तेथे शुशुप्ती अवस्था अहंकार प्राज्ञ ॥ हृदयस्थानी अधिष्टान ॥ जाण तयाचे ॥ ३५ ॥ माहाकारण देहे ज्ञातृत्वलक्षण ॥ जयाचे

मूर्ध्नीस्थान ।। तुर्य अवस्था जाण ।। अभिमानी प्रत्यगात्मा ।। ३६ ।। ऐसे देहे चतुष्टय अभिमानी चतुष्टय ।। अवस्था चतुष्टय स्थान चतुष्टय ।। हे परिसतू मुनिवर्य ।। जे विवेकज्ञानी ।। ३७ ।। पिंड उपाधी वेगळी पाही ।। जीवासि अवस्था नाही ।। अविद्योपाधी सर्व हीन विकार चेष्टा ।। ३८ ।। ब्रह्मांडा वे ( ग ) ळे पाही ।। देवासि अवस्था विकार नाही ।। मायोपाधी पाही ।। ज्ञानविकार चेष्टा ।।३९।। अता वसंत रुतु सत्ता वनस्पती ।। वृधी हरास ( ऱ्हास ) आणि स्थिती ।। निरंतर अवस्था शुशुप्ती ।। अहेर्निसी ।।४०।। येवं ब्रह्मांडी अवस्था शिवासि मायोपाधी ।। आणि पिंडी अवस्था जीवासि अविद्योपाधी दोहीचा निरास निरोपाधी ।। कैवल्यनिधी निजात्मा ।। ४१ ।। श्रीगुरुचे वचन लाधले ऐसे ।। तव सिष्य परमसंतोषे ।। प्रस्नवचन पुन्हा कैसे ।। विचारिता जाला ।। ४२ ।। पत्रवचन ।। जीव शीव तो कवण ।। देहे चळे कवणापासुन ।। चेतवी प्रेत प्राण ।। गेलिया कवण तो जी ।। ४३ ।। उत्तर ।। तव सद्गुरू फेडी संदेहो ।। ब्रह्मांडी मायोपाधी चाले तो शिव ।। पिंडी अविद्योपाधी चाली जीव ।। स्थूळ देहे चले अभिनव लिंगदेहापासुनी ।। ४४ ।। तया चाळकाचे चाळक जाण ।। ते चैतन्य कारण ।। लोहचुंबकन्याये जाण ।। अनात्माजडासि अत्मा न चळोनि चाळी ।। ४५ ।। प्राण गेलियावरी ।। भूतचेष्टे स्तव क्षणभर विकारी ।। लिंग देहे गेलियावरी ।। विकार कैचा ।। ४६ ।। ऐसे निरोपिता सद्गुरु ।। तव सिष्य करी प्रश्नादरू ।। सांगित जी वचन निर्धारू ।। पृछापत्रीचा ।। ४७ ।। ।। पत्रवचन ।। ब्रह्मी जीव भिन्न ।। की जिवाब्रह्मा येकपण ।। या ब्रह्मांडासि कवण ।। आधारू आसे ।। ४८ ।। उत्तर ।। हे अशंका निरसावया ।। कृपा उपजली सद्गुरुराया ।। म्हणे जीव–ब्रह्मी भेद भिन्न देखावया ।। अविद्या उपाधी ।। ४९ ।। देहेच देहे चतुष्टय निरासी ।। अनुभवे उरी नाही जिवासी ।। तेथे येकपण ते कवणासी ।। उपाधी निरसता ब्रह्म परिपूर्ण ।। ५० ।। या पिंडब्रह्मांडासि अधार मूळमाया शक्ती ।। परब्रह्मसत्तें जयेसि आस्तितव गती ।। जैसी मृगजळाची वस्ती ।। दिनकरांश्रये ।। ५१ ।। ऐसे सद्गुरू निरोपती ।। तव सिष करी विनंती ।। म्हणे पृछापत्री विचारिले जे ।। ५२ ।। पत्रवचन ।। ब्रह्म निर्गुण केवळ ।। माया महाढिसाळ ।। तियेसि अधार मूळ ।। काय असे ।। ५३ ।। ब्रह्म पूर्ण की अपूर ।। शास्वत की देशांतर ।। कर्मभक्ती निर्धार ।। जोडे की न जोडे ।। ५४ ।। उत्तर ।। तव प्रतिवचन निर्धारू ।। निरोपिता स्वामी सद्गुरु ।। सकळमाया डिसाळासि अधारु ।। सत्यात्म वस्तू लोहचुंबकन्याये ।।५५।। ब्रह्म पूर्णापूर्ण शाश्वत असे ।। ते पावावया साधन परिसे ।। कर्म भक्तिज्ञान असे ।। वेदशास्त्र पुराण बोलती ।। ५६ ।। कर्म करिता लागे भक्ती ।। भक्तीने ज्ञानाची प्राप्ती ।। ज्ञानविवेके सद्गुरुचरण जोडती ।। ते विज्ञाने निरसती कर्मभक्ती ज्ञान ।। ५७ ।। सद्गुरुचेरण प्रसादे पूर्ण ।। अनुभवे निजात्मखुण ।। परि सद्गुरुकृपेवाचुन ।। न जोडे परब्रह्म ।। ५८ ।। ऐसे वचननिरास ।। करी सद्गुरू परेश ।। तव विचारी सिष्य ।। पुन्हा पत्रवचन ।। ५९ ।। पत्रवचन ।। अजपा ते कवण ।। जपाचे काय प्रमाण ।। देवताचक्री निवेदन ।। कैसे केले ।। ६० ।। हे कैसी चालती अजपा ।। कवण जपू या अजपा ।। हा जप पडपा ।। कैसा अला ।। ६१ ।।

हा कवणे टाई कैसा उटे ॥ कैसा केधवा कोटे अटे ॥ दोन्ही अक्षर प्रगटे ॥ करूनि दीजे ॥ ६२ ॥ उत्तर ॥ तव प्रश्नभेद निरसावया उदीत ॥ बोले स्वामी सद्गुरूनाथ ॥ अजपाचा वृत्तांत ॥ पिंडी पाहिजे ॥ ६३ ॥ सप्तचक्रामाजि पिंडी जाण ॥ साह शत यकवी ( स ) सहस्र जपाचे प्रमाण ॥ अहोरात्री जाण ॥ प्राणवायो समंधे घडे ॥ ६४ ॥ देही प्राण तव चाले अजपा ॥ साक्षभूत जाणे सोहं जपा ॥ देहेरूपा स्तव पडपा ॥ जप अला ॥ ६५ ॥ या सकल दस्या उटावया अटावया स्थान ॥ येक परब्रह्म पूर्णघन ॥ तेथे सकळ भेदमान ॥ उटे आटे ॥ ६६ ॥ ऐसा निरसोनि पृछापत्र भेद ॥ तव सिष्य करी अनुवाद ॥ पुन्हा पत्रवचनीच्या शब्द ॥ विचारिता जाला ॥ ६७ ॥ पत्रवचन ॥ हृदय कमळकलिके भीतरी ॥ चंद्र असती चारी ॥ तेथे चौसष्टी क्रिडा करी ॥ ते कोण स्थान ॥ ६८ ॥ कोणते क्रीडा मंदिर ॥ कोटोनि उटती देहे विकार ॥ स्थूळ सुक्षम शरीर ॥ गती कैसी ॥ ७० ॥ देही इंद्रिय अनेका ॥ वाचा कोणते कळाचाळका ॥ तेथिचिया सुखदुःखा ॥ कोण जाणे ॥ ७१ ॥ तेथेचि त्रिन्ही लोक ॥ तोही दाखवा ( वा ) विवेक वाचा देहे स्थाने सकलिक ॥ शून्यासि सांगा ॥७२॥ उत्तर ॥ तव सद्गुरु सांगे निरोपण ॥ हृदयकमळ कळिके मधे जाण ॥ चतुर्थ पदार्थ चंद्र जाण ॥ मनभेद वर्तती ॥ ७३ ॥ अन्नजटर परिपाकानंतरे ॥ कुंडलनी(*) नळे व्यानपवनाधारे ॥ येकत्रय-नवनळे विखरे बाहत्तर छिद्री ॥ ७४ ॥ नवनाडी सोळा सांदी ॥ बाहत्तरकोट सर्वादी ॥ मनमुखे चौसष्टी कुमोदी ॥ निववी चंद्रकळा ॥ ७५ ॥ मन उन्मन जालियाबरी ॥ सर्वही जाले अविकारी म्हणोनि मनमुखे अंतःकर्ण क्रीडा मंदिरी ॥ चतुष्टय चंद्र ॥ सुक्षम देहापासोनि जाण ॥ देहे विकार चळती भिन्न भिन्न ॥ स्थूळ सप्तधातू कारण ॥ सुक्षम अंतकर्ण चतुष्टये ॥ ७७ ॥ देहे इंद्रियासि जाण ॥ लिंगदेह करी चळण ॥ ईंद्रियासि राजा मन ॥ तेथील सुख दुःख मनचि जाणे ॥ ७८ ॥ या मनासहीत देहे चतुष्टय क्षत्रासी ॥ चैतन्य चाळक साक्षभूत परियेसी ॥ तत्साक्षीत्व उपाधीरहीत सहजेसी ॥ शुत्धबुत्ध वस्तू ॥ ७९ ॥ त्रिकुट त्रिखंड कपाळ देख ॥ वामसव्यमध्य उभय येक ॥ त्रिगुण गुण पृथक पृथक ॥ दिसती भेद ज्ञानिया ॥ ८० ॥ परावाचा ब्रह्मद्वारी ॥ वोळगती अटवे हृदयाभितरी ॥ ध्वनी ज्ञाने योगेश्वरी ॥ वोळखिजे ज्ञान परा हृदई ॥ ८१ ॥ पस्यंति ते अधारी ॥ मध्यमा हृदया भीतरी ॥ मुखीं वैखरी मात्रुकाक्षरी ॥ प्रगट दिशे ॥ ८२ ॥ येवं द ( दे )ह चतुष्टयाभीतरी ॥ चारी वाचा चौस्थानी वायु अधारी ॥ तेथे भ्रमर गुंफेवरी ॥ चतुर्थशून्य अनुभविजे ॥ ८३ ॥ सद्गुरूचेनि कृपा वळे ॥ शून्य प्रमावेगळी वेगळी कळे ॥ हे सकळीक विवेकसहित मावळे ॥ निराभास ब्रह्मी ॥८४॥ ऐसा सांगीतला वचनार्थ ॥ तव सिष्ये विनविला सद्गुरूनाथ ॥ म्हणे परिसा जी मात ॥ पत्र वचनाची ॥८५॥ पत्रवचन ॥ जेथोनि ब्रह्मी सकळजन ॥ ऐसा कर्ता तो कवण ॥ पाळिता नारायण ॥ कोण पाळी ॥ ८६ ॥ रुद्रादि सव्हारिता ॥ कवण संव्हारकर्ता ॥ इश्वरादिकादिकादिकादि

---

* **टीप**—केवळ काकपद असून बाकी कांहीं दिलेलें नाहीं.

चाळिता ॥ तो सूत्रधारी कवण ॥८७॥ जो सर्वत्री सदावसे ॥ जेणे सर्व व्यापिले असे ॥ तो सदाशीव प्रकाशे ॥ प्रत्यक्ष कैसा ॥८८॥ उत्तर ॥ तिन्ही अहंकार तिन्ही शक्तियुक्त ॥ इश्वरसत्ता उत्पतीस्थिती लयो चालिन ॥ माया अविद्या समायुक्त ॥ होत जात सर्वही ॥ ८९ ॥ येवं सृज्यसृजिता चतुरानन ॥ स्थिती पाळिता नारायण ॥ सव्हारकर्ता रुद्र जाण ॥ ऐसे गुण तिन्ही ऐश्वर्य इश्वराचे ॥ ७ ॥ तया इश्वरमाया अनंत ॥ ब्रह्मांडाबाहीर आत ॥ सूत्रधारी अच्युत ॥ करोनि अकर्ता जो ॥ ९१ ॥ ऐसा अकर्ता जो अमूर्त ॥ तोचि सूत्रधारी अनंत ॥ म्हणोन स्वमुखे सांगत ॥ भगवद्गीते सातवेध्याइ ॥ ९२ ॥ या अनंत ब्रह्मांडासबाह्य सर्वत्र वसे ॥ तो सदाशिव निरोपाश्वी गुरुमुखे प्रकाशे ॥ मग प्रत्याक्ष.कार होता नाशे ॥ शब्दभेदू ॥ ९३ ॥ तेथे नामरूप याती गोत्र ॥ अत्मासत्य अनात्मा अनिर्वचनिय सर्वत्र ॥ म्हणोनि समूळ पृछापत्र ॥ सर्वथा सर्वत्र अशंका ॥ ९४॥ शब्दगती न पडे ठाई ॥ ते शब्द चर्चा करणे काइ ॥ म्हणोनि सद्गुरूकृपा पाही ॥ अनुभव लाधे ॥ ९५ ॥ मग सद्गुरू म्हणे सिष्यासी ॥ हा अनुभव असेल पृछापत्र पाटविलेल्यासी ॥ तरी सुख होइल राजचंद्रासी ॥ नाही तरी सद्गुरू करोनि भ्रांतीसी निर्शन कीजे ॥ ९६ ॥ प्रपंच उदरपोषणा कारणे ॥ अनंत अटाटी करणे ॥ मा परब्रह्मपद विवरणे ॥ तेथे करणे मतिमंद पण ॥९७॥ उत्तमतीर्थ शेवणे ॥ वैराग्य सद्भक्ती संत अराधन करणे ॥ त्याचिया चरणप्रसादे पावणे ॥ प्रत्यक्ष अनुभव ॥९८॥ मग निरसप्रछापत्र सोसू ॥ अनुभवे येकात्मता परेशू ॥ आणि निरशे गुरूसिष द्वंद्वलेशू ॥ मग उरे निराभासू अखंडत्वे ॥ ९९ ॥ तेथे होणे ना होणे ॥ अनुभवेचि अनुभवणे ॥ मग अनुभवेचि अनुभव पूर्णपणे ॥ सहजचि असे ॥१००॥ ॥२००॥ ऐसा वडवाळसित्ध नागेश पूर्ण ॥ गुरूसिष्यनिद्वंद्व अनुभवे करून ॥ तेथे सिष अज्ञानज्ञानरहित जाण ॥ विज्ञान पूर्णापूर्णत्व सहज ॥ १ ॥ वो. २०१॥

इति श्री पृछापत्रसंपूर्णमस्तु ॥ कसबे मोहोळ स्वग्रही संग्रहार्थ भानजी त्रिंबक देशलेखकेन लिख्यते ॥ शेके १७९३ प्रजापति नाम सवत्सर ॥ कार्तिक कृष्ण ८ भोमवासरी प्रथम प्रहरी समाप्तमस्तू ॥ शुभं भवतू ॥

---

# ७ समर्थ संप्रदायांतील एक अज्ञात कवि दत्त.

[ श्री. रा. शं. नगरकर, पुणें ]

कांहीं दिवसांपूर्वी भा. इ. सं. मंडळांतील बाडें चाळीत असतांना ४५७ क्रमांकाच्या बाडानें माझें लक्ष वेधून घेतलें. तें वेधण्याचें एक प्रमुख कारण म्हणजे या बाडांत एकाच कवीची कृति आहे. बाड तसें फारसें मोठें नाहीं. त्याचीं आद्यंतींचीं कांहीं पत्रें नष्ट होऊन अवघीं सदतीस पत्रें आपल्या हातीं राहिलीं आहेत. प्रत्येक पृष्ठावरील ओळींची संख्या सुमारें सतरा असून त्याचा आकार ७″ × ९″ असा आहे. हें बाड

दोन माणसांनीं नकललेलें असावें. कारण अक्षरांचीं दोन भिन्न भिन्न वळणें आहेत. असें असलें, तरी गचाळपणाच्या बाबतींत मात्र तीं वळणें एकमेकांवर ताण करणारीं आहेत. या आडव्या शिवलेल्या वहींत कोण्या 'दत्त' नामक कवीची कविता आहे.

प्रथमदर्शनींच हें बाड रामदासी असावें, अशी शंका आली. या शंकेला, दोन कारणें होतीं. पहिलें कारण म्हणजे प्रत्येक पदाच्या सुरुवातीला 'श्रीरामप्रसन्न' वा 'रघुवीर समर्थ' अशीं घोषवाक्यें आहेत. आणि दुसरें कारण म्हणजे या बाडांत अनेक ठिकाणीं रामदासांचे श्लोक नकलले आहेत. हा संशय समग्र बाडाच्या अभ्यासानंतर खरा ठरला.

सुमारें १६४ स्फुटें ( अभंग व पदें ) असलेल्या या बाडांतील कांहीं पत्रांचे कोपरे झिजलेले असल्यामुळें कांहीं पदांतील कांहीं अक्षरें नष्ट झालीं आहेत; पण सुदैवानें त्याचें आत्मचरित्रपर पद उत्तम स्थितींत आहे. त्या पदांतील मजकुराच्या आधारें आपणांस असें सांगतां येतें कीं—

दत्ताच्या मातेचें नांव गिरिजा आणि पित्याचें नांव जनार्दन. हा ऋग्वेदी विश्वामित्र गोत्री ब्राह्मण होता. सातारा जिल्ह्यांतील अतीत नामक गांवांत त्याचा जन्म झाला. विठ्ठलदास असें त्यानें आपल्या गुरूचें नांव त्या पदात नोंदलें आहे. या अतीत गांवांत शमनामीर नांवाचा एक पीर होता आणि हनुमंत हा तिथला श्रेष्ठ ग्रामदेव होता, अशी त्यानें गांवाच्या ओळखीसंबंधीची अधिक माहिती पुरविली आहे. त्याचें आत्मचरित्रपर पदच पुढें उद्धृत करीत आहें—

जनार्दन पिता गिरिजा माझी माता। जन्म जाला दत्ता तेथूनिया ॥ १ ॥ जन्मभूमी नांव अतीत नगर। पीर शमनामीर तये रानीं ॥ २ ॥ ग्रामदेव श्रेष्ठ हनुमंत देव। सत्याचा निर्वाह मोठा तेंथें ॥ ३ ॥ ऋषि-मुनींमाजीं विश्वामित्र जाणा। ऋग्वेद-राणा वेदांमाजी ॥ ४ ॥ प्रवृत्तीचें नाम दत्त ठेवियेलें। तेचि खरें केलें गुरुदेवें ॥५॥ गुरुदेवें बोध निश्चयाचा केला। तेणें गुणें जाला अनुताप ॥६॥ अनुतापें सर्व मायिक भासलें। लक्ष हें बैसलें निरालंबीं ॥७॥ निरालंब सुखस्वामी विठ्ठलदास। दत्ताचा विश्वास तये ठायीं ॥८॥

कृष्णेचा परिसर ही रामदासांची कर्मभूमि आहे. त्या परिसरांतच हा कवी होऊन गेला. त्यानें उल्लेखिलेल्या शमनामीराचा रामदासाच्या जीवनाशीं थोडा संबंध आहे. शमनामीर हा एक मुसलमान साधु. एकदा त्याच्या वार्षिक उरुसाला समर्थ उपस्थित झाले असतांना हा साधु प्रकट झाला, आणि त्यांचे परमार्थसंबंधीं कांहीं आदान-प्रदान झालें, अशी कथा 'दासविश्रामधामा'च्या १८ व्या अध्यायांत आहे.

या बाडांतच विठ्ठलदासाचें एक विस्तृत पद आहे. या पदांत विठ्ठलदासाला रामदासांकडून झालेल्या प्रत्यक्ष गुरुबोधाच्या क्षणाचें तपशीलवार वर्णन आहे. प्राचीन मराठींत जीं हाताच्या बोटांवर मोजण्याइतकीं अशीं तपशीलवार वर्णनें आहेत, त्यांतच

या पदाची गणना करावी लागेल. गुरूनें त्याला कुरवाळून त्याचें चुंबन घेतलें. त्याच्या पाठीवर थाप मारली आणि त्याला मंदिल ( रुमाल ) बांधला. त्याची दृष्ट काढून त्याच्या गळ्यांत हार घातला, आणि डोक्यावर तुरा चढविला. त्याला चादर दिली. त्याच्या हाताला धरून त्याला आपल्या जवळ बसवून घेतलें आणि सर्वांकडून त्याचा बहुमान करविला. गुरुबोधाच्या क्षणाचा इतका बारकावा देणारें हें संपूर्ण पदच इथें उद्धृत केल्यास तें अस्थानीं ठरणार नाहीं.

ककुद्मतीतीरीं आहे चंद्रगिरी। तेथें राज्य करी स्वामी माझा ॥ १ ॥ स्वामी माझा रामदासांचें मंडन। भवाब्धिखंडन त्याच्या बोलें ॥ २ ॥ ऐसी पैं हे कीर्ती ऐकोनिया कानीं। आठवलें मनीं जावें भेटी ॥ ३ ॥ माघ शुद्ध आणि गुरुवार ते दिसीं। गेलो समर्थांसीं भेटावया ॥ ४ ॥ दीर्घ दंडवंत केली प्रदक्षणा। बध्दांजुळी जाणा। उभा ठालों ॥ ५ ॥ कृपादृष्टींपूर्ण पाहिलें ते काळीं। पूजा सायंकाळीं आज्ञा केली ॥ ६ ॥ आज्ञा केली मग जाला सायंकाळ। पूजेचें सकळ सिद्ध केलें ॥ ७ ॥ जाला पूजाविध अनुग्रह केला। पद्महस्त ठेला मस्तकीं तो ॥ ८ ॥ जाले सात दिस मग आज्ञा केली। भिक्षेलागी दिल्ही आज्ञा तेव्हां ॥ ९ ॥ आज्ञासमर्थांची वंदूनिया शिरीं। माथा चरणांवरी ठेविएला ॥ १० ॥ कुर्वाळुनि मुख चुंबन पै दिलें। हृदयीं आळंगिलें प्रेमप्रीतीं ॥ ११ ॥ थापटिली पाठी मंदिल बांधलें। निंबलोण नेलें उतरोनी ॥ १२ ॥ आणीली मेखळा गळाचे पैं हार। तुरा आणि चादर दिल्हीं तेव्हां ॥ १३ ॥ धरुनिया करीं जवळीं बैसविलें सर्वां करविलें बहुडीयासी ॥ १४ ॥ गेले सर्व लोक एकांत पै जाला। मग गुज बोलिला स्वामी माझा ॥ १५ ॥ स्वामी माझा गुज बोलिला जीवींचे। आणि भविष्याचें चिन्ह कांहीं ॥ १६ ॥ भविष्याचीं चिन्हें सांगितली देवें। म्हणें मनी अनुभवावें न बोलवी ॥ १७ ॥ म्हणे विठ्ठलदास कासया बोलावें। आपेआप ठावें होईल जनां ॥ १८ ॥

विठ्ठलदासाच्या ऐवजीं आपणच तिथें आहोंत, अशी कल्पना करून तें क्षणचित्र आपल्या डोळ्यांसमोर उभें केलें, तर त्या पदांतील खुमारी आणि धन्यता ही आपणांस सहज कळणारी आहे.

विठ्ठलदासाला समर्थांकडून गुरुबोध ज्या स्थानीं प्राप्त झाला, तें निसर्गरम्य स्थान अल्पकाळ समर्थवास्तव्यानें पुनीत झालें होतें. रामदासांना सृष्टिसौंदर्याची फार ओढ असे. ही सृष्टिसौंदर्याची ओढ आपल्याला ' हनुमंताकारणें ' लागली, असे त्यांनीं स्वतःच सांगितलें आहे. शहापूरच्या डोंगरावर राहून ते जसे हनुमंताचें दर्शन घेत असत त्याचप्रमाणें चंद्रगिरी ऊर्फ चांदोबाच्या गुहेंत राहून ते भीमकाय हनुमंताचेंच चिंतन करीत असत. निसर्गाच्या प्रशांत पार्श्वभूमीवर येणारा अनुभव त्यांनीं उत्कट शब्दांत व्यक्त केला आहे.

चंद्रगिरीचा डोंगर। त्यांत गुप्त एक शिखर। तेथें राहे योगेश्वर। निरंजन॥ रे नवल त्या निरंजनाचें शिखर पाहों आकाशाचें। ऐसें पृथ्वीमध्यें कैचें। पाहों जातां

जागा सुंदर गहन। तेथें सुखावलें मन। वरी पाहतां गगन। सांटवलें॥ तेथें अखंड नाहीं वात। म्हणऊनि जागा तो निर्वात। शीतकाळीं घुमघुमीत। वस्त्र न लगे॥

या पुढें या पदांतच निसर्गाच्या अन्य दृश्यांचाहि उल्लेख आहे.

समर्थांचें एक डफगाणें आहे. त्या गाण्यांत कोल्हापुरापासून शहापुरापर्यंत असलेल्या निरनिराळ्या तीर्थस्थानांची माहिती देत असतांना समर्थ स्वतः संबंधीं लिहितात—

चंद्रगिरीमध्यें गवी। तेथें वास करी कवी।
त्याची जागा ते पुरवी। शहापुर॥

या गुहेंतील समर्थांच्या वास्तव्याचा कालावधि सुमारें शक १५६७–६८ असा दिला जातो. या वास्तव्यांतच विठ्ठलदासाला त्याच्या गुरुकडून गुरुबोध झाला आहे. विठ्ठलदासाचें जें पद वर उद्धृत केलें आहे, त्यांत त्याच्या गुरुबोधाची तिथि नाही. गुरुबोधाविषयी तपशीलवार माहिती देणाऱ्या या संतानें गुरुबोधप्राप्तीची तिथि दिली नाहीं, असें म्हणवत नाही.

'माघ शुद्ध आणि गुरुवार ते दिसीं।' हा त्याच्या पदांतील एक चरण आहे. या चरणांतील 'आणि' हा शब्द निरर्थक आहे. या पदाची ज्यानें नकल केली असेल, त्याला तें पद न समजल्यामुळें त्याच्या हातून ही घोडचूक राहून गेली आहे. विठ्ठलदासाला प्राप्त झालेल्या गुरुबोधाच्या काळावरून आपल्याला दत्ताचा काळ ठरवितां येतो. इ. स. च्या सतराव्या शतकाचा उत्तरार्ध व अठराव्या शतकाचा पूर्वार्ध हा स्थूलमानानें दत्ताचा कालावधि ठरविण्यास हरकत नाहीं. त्याचप्रमाणें रामदास–विठ्ठलदास–दत्त अशी त्याची परंपरा ठरते.

संतश्रेष्ठ तुकारामाप्रमाणेंच दत्त संसाराच्या तापानें फार तापला आहे.

कुटुंब पोसाया पोटधंदा केला। तेणें कष्ट मला फार जाले॥

केलेला धंदा त्याच्या गळ्याशीं आला. त्याच्या परिणामाला त्याला एकाकींच तोंड द्यावें लागलें. जन हे दिल्याघेतल्याचे असून, अंतकाळचे खरे सोबती कोणी नाहींत, या विचारामुळें खिन्न होऊन अनुतापाचा कंद त्याच्या मनांत रुजला. आणि तिथें त्या कंदाला हळूहळू नवनवीन धुमारे फुटूं लागले. सर्व माया सांडून तो परमेश्वराला प्रेमभरानें शरण गेला आणि—

देहाचा संकल्प स्वामीलागी केला। तयावीण मला नाहीं सखा॥

या अवस्थेपर्यंत त्यानें मजल मारली. आतां त्यानें देहाचा संकल्प रामासाठीं केला, पण अजून त्याला रामदर्शन मात्र घडलें नव्हतें. त्यामुळें जीवनावेगळी केलेली मासोळी जशी तडफडते, तशी त्याच्या मनाची अवस्था झाली होती. तो श्रीरामाला सरळ सरळच विचारूं लागला कीं—

सांडून सर्वै आस। दृढ धरिली तुझी कास। आतां कैसे करिसी उदास। श्रीरामराया ॥

सांवळ्या श्रीरामा, आतां आणखी माझी परीक्षा पाहूं नकोस, तुला जर माझ्या निष्ठेची शंका आली असेल, तर पुन्हा एकदा माझें म्हणणें नीट ऐकून घे—

तुजवीण मज असेल आधार। तरी माझें शरीर कुष्ठ होये ॥ १ ॥ तुजवीण दुजें मानीन मी जनीं। तेव्हां तेच क्षणीं देह भंगो ॥ २ ॥ कोण मज आहे आणिक सोयरा। हें मनीं विचारा दत्त म्हणे ॥ ३ ॥

रामचंद्रांच्या सूचनेवरून दिव्याला तयार झालेली सीता म्हणाली की, जर रामचंद्राशिवाय दुसरा विचारहि माझ्या मनांत आला नसेल, तर हे देवी तूं मला आपल्या उदरांत स्थान दे. इथें सीतेच्या या करुण वचनाची आठवण न झाली तरच नवल.

दत्त पुढें म्हणतो, आतां तरी माझ्याकडे डोळे उघडून बघ. तूं कृपेचा सागर, दीनांचा दाता, पतितपावन म्हणून जगीं तुझी ख्याती आहे. विश्रांतीचें घर म्हणून वेद तुझ्याकडे पाहतात. तेव्हां देवा, मनीं कांहीं तरी करुणा असूं द्यावी, नाहीं तर तुझ्या सर्वसाक्षीपणाला बोल लागेल. लोक तुला कूर्मदृष्टीचा म्हणतात. आतां माझें उणेंपुरें न पाहतां मला तुझ्या दृष्टीचें पोसणें दे.

आर्तता हा साधकाच्या जीवनांतील पहिला टप्पा आहे. यालाच कदाचित् आत्म्याची काळोखी रात्र म्हणत असतील. विरहिणीच्या स्वरूपांतून केलेलीं पदेंहि याच भागांत मोडतात. कारण परमेश्वराची करुणा भाकण्याचा तोहि एक मार्ग आहे. भक्त या मार्गाचा अवलंब करतात.

परमेश्वर हा आपला प्रियकर आणि आपण त्याची प्रेयसी या भूमिकेंतून त्याची आळवणी करणें असा तिथला थाट असतो. अनुरागाच्या भूमिकेंतून उत्पन्न होणारी उत्कंठा, उत्कटता व विकलता ही विलोभनीय असते. त्या जीवशिवाच्या मीलनप्रसंगीं बाह्य जगाचा पडणारा विसर आणि त्यामुळें मानसिक स्थित्यंतरांचें घडणारें कमनीय दर्शन हा काव्याचा एक विलोभनीय विशेष आहे.

दत्ताच्या कवितेंत हा विशेष दृग्गोचर होतो. त्याच्या प्रियकराचें नांव आहे राघव. त्या राघवाच्या पायीं त्याचा सर्व ' हेत ' गुंतला आहे. राघवाशिवाय त्याचें मन अन्यत्र कोठेंहि स्थिर व्हायला तयार नाहीं.—

बाईये गे। राघवपायीं गुंतला माझा हेत। आनु बैसेना कोठें चित्त ॥

वेद माझ्या श्रीरामाचें गायन करतात; शास्त्रें त्याला धुंडाळतात. आणि शिव त्याचें ध्यान करतो, असा आपल्या प्रियकराचा यथार्थ गौरव त्यानें केला आहे. असा हा सर्व सामर्थ्यानें युक्त असलेला श्रीराम मी साक्षात् पाहिला, असें दत्तानें आवर्जून सांगितलें आहे.

दत्ताला काळोख्या रात्रींत फार काळ राहावें लागलें नाहीं. बोधाचा उजाळा त्याला लवकरच प्राप्त झालेला दिसतो.

स्वामीची दया जाली । ज्याची त्यास कळो आली ॥ धृ ॥ जेथें पाहे तेथे देव। रिता न दिसे कोठें ठाव ॥ १ ॥ रूप पाहतां रूपा नये । ऐसें जालें मी सांगों काये ॥ २ ॥ दत्त विस्मित मनीं जाला । दास विठ्ठलीं विराला ॥ ३ ॥

असा त्यानें साक्षात्काराचा अनुभव नोंदून ठेवला आहे. मी आतां सर्व लोक-लाज टाकून अंतरीं देव धरला, त्यामुळें कोणास काय म्हणायचें असेल, त्यानें तें खुशाल म्हणावें, कारण—

आम्ही देवाचे पै वेडे । निःशंक निधडे ॥ धृ ॥ सुखें छंद करूं फार । आम्हां नाहीं हो विचार ॥

परमेश्वराशीं जवळीक साधल्यामुळें त्याची अभिमानाची गवसणी गळून पडली. संसार देशोधडीला लागला आणि सारें शून्याकार झालें. याच्या नादीं लागलें कीं याशिवाय अन्य कांहीं मिळत नाहीं, असा त्याचा अनुभव आहे.

दत्त म्हणे करिसी काये । मज अनुभव तोचि आहे ॥

ज्याच्या भेटीमुळे मी–तूंपणाची भाषा विरून जाते, अहंकार गळून पडतो, त्या श्रीरामाच्या सामर्थ्याला उपमा नाहीं, असें दत्ताचें सांगणें आहे. जो निखळ ज्ञानी आहे, त्यालाच केवळ तुझ्या कळा कळतात, असें त्यानें एका पदांत म्हटलें आहे. आपण जी गोष्ट हातीं घेतली असेल, त्याला जर भगवंताचें अधिष्ठान नसेल, तर ती गोष्ट सिद्धीस जात नाहीं. रामाशिवाय केलेले सर्व श्रम वायां जातात, म्हणून—

दत्त म्हणे राम साह्ये। तेणें सर्व सिद्धी होये ॥

रामाच्या केवळ नामस्मरणानें अपार जन्मखेपा तुटतात, असंख्य प्राणी पुण्यशील होतात, यासाठीं त्या समर्थ श्रीरामाचें ध्यान करावें, असा दत्ताचा विचार आहे.

पूर्ण चंद्राचें दर्शन घडतांच सागराला जशी भरती येते, तशी सद्गुरूसंबंधींच्या गुणवर्णनांत दत्ताच्या वाणीला भरती येते.

गुरुची कृपा पूर्ण होईल बा रे । तरी मोह संताप तेथें न थारे । गुरूप्राप्तता संचीतावीण नाहीं । दत्त लागला पूर्ण सद्गुरूपायीं ॥

लज्जा आणि अभिमान यांचें निरसन करून गुरुदास्य केलें पाहिजे, सद्गुरु आणि परमेश्वर हे एकच आहेत, असा दृढभाव त्याच्या मनांत आहे.

मनीं धरूनिया दृढभाव । सद्गुरू देवाधिदेव । ऐसा करावा निश्चयो दृढपणें ॥

सद्गुरूसंबंधींचा अपार दृढभाव संतसाहित्य रसिकांना फारसा अपरिचित नसल्यानें त्याचा प्रपंच अधिक न करणेंच बरें.

सद्गुरूच्या भेटीनें दत्ताला जो आनंद होतो, तोच आनंद त्याला संतांच्या भेटीनें

होतो. संत हेंच त्याच्या जीवींचें सर्वस्व आहे. संतांचें दर्शन हीच त्याची काशी आहे. त्यांच्या नामाला तीर्थांचें पावित्र्य आहे. संत हेच त्याच्या सुखाची खाण आहेत. याहि पुढें जाऊन दत्त म्हणतो—

तेच माझें जीव तेच माझे शिव । म्हणऊनी दत्त भाव धारिजे मनीं ॥

जीव–शिव स्वरूपांत संतांना पाहणारें दत्ताचें मन त्यांच्यांत भेद करायला तयार नाहीं. जे कोणी हा संत आजचा आणि हा संत कालचा, असे भेद करतात, त्यांच्या बाबतींत दत्त म्हणतो—

न कळोन म्हणती चुकोन बोलती । नेणोन मानिती नवे जुने ॥

हा रामदासांचा प्रशिष्यच असल्यामुळें त्यांच्या विचारांचा प्रभाव याच्या मनावर असल्यास नवल नाहीं. रामदासांनीं श्लोकशतकांचा विषय केलेलें 'मन' यानेंहि आपल्या विवेचनाचा विषय बनविला आहे. समर्थांनीं अभिमानाची अतिरेकी टर उडविली आहे. तसेंच यानेंहि मोठ्या नेटक्या शब्दांत त्याचे दुष्परिणाम दाखवून दिले आहेत. आचारधर्माच्या बाबतींत रामदासांचा कटाक्ष आपल्या परिचयाचा आहे. ब्रह्मज्ञानाला जर क्रियेची जोड नसेल, तर तें ब्रह्मज्ञान कुचकामी आहे. असें दत्तानें आवर्जून सांगितलें आहे.

तोचि जाणा ब्रह्म पूर्ण। क्रियेसहित ब्रह्मज्ञान ॥

या दत्ताच्या काव्यपंक्ति वाचल्यानंतर आपणांपुढें

भले नष्ट दोघे कसे ओळखावे । क्रियाभ्रष्ट ते नष्ट जाणोन घ्यावे ॥

रामदासांच्या या ओळी आल्या नाहींत तरच नवल !

रामचरित्राचें गुणगान करण्यांत धन्यता मानणारी दत्ताची वाक्सरिता अत्यंत समर्थपणें कृष्णाचेंहि गुणगान करतांना दिसते. त्याच्या दृष्टीला राम आणि कृष्ण वेगळे दिसत नाहींत. विठ्ठलस्वरूपांत रामचंद्राचें दर्शन घेणाऱ्या समर्थांच्या विचारांचाच हा प्रभाव आहे. या विचारांमुळेंच मराठी भक्तिपरंपरेची उदार व समन्वयशील घडण झाली आहे. तिच्यांतील औदार्याचें भरणपोषण याच मार्गानें झालेलें आहे. दत्त जितक्या सहजतया श्रीरामाचें वर्णन करतो, तितक्याच सहजतेनें व तन्मयतेनें गोकुळवासी कृष्णाचेंहि तो गुणगान करतो.

गोकुळीचा कान्हा नाटका जाणा । तेणें मोहिलें माझ्या मना ॥ सासुर माहेर दोनी विसरलें । नेणें तेणें काय केलें ॥ दत्त म्हणे मज आठवत नाहीं । चेटकी मोठा हा बाई ॥

रामकृष्णांचें समान गुणगान करणारी त्याची वाणी अत्यंत साधी, सोपी आणि प्रासादिक आहे. तिला अलंकारांचा हव्यास नाहीं. यमक–अनुप्रासासाठीं कुठेंहि ओढाताण झालेली नाहीं. भक्ति हा त्याच्या भाषिक सौंदर्याचा अखेरचा निकष आहे आणि या निकषाला तो पुरेपूर उतरला आहे.

---

# ८ शिवरामकृत वंकटतरंगिणी

[ डॉ. वा. ना. मुंडी, इंदूर ]

ग्वाल्हेरच्या मातृभूमि कार्यालयांतील हस्तलिखित ग्रंथसंग्रहांत उपर्युक्त पोथी आहे. नांव 'वंकटतरंगिणी,' एकूण पानें १०५, देवनागरी अक्षर व टीका.

**कर्ता** :—या 'वंकटतरंगिणी'चा कर्ता **शिवराम** हा आहे (अ. ११। ओ. २२७).

> सहजबोधाचा आत्मकुमर शिवकल्याण; त्याच्या वंशांत
> गोपाळादि झाले; तेथेंचि उद्भव **शिवरामासि** ।।

**रचनाकाल** :—हा ग्रंथ श. १७०५ मध्यें रचला गेला.

> शके सत्राशे पंचोत्तर । शोभन नामे संवत्सर
> कृष्णदशमी भानुवार । माघ मासीं हा ग्रंथ ।। ११ । २३५

**प्रतलेखक, लेखनकाल व स्थान** :—हस्ताक्षर यशवंत नारायण, वस्ती इंदोर—संमत १८४१, कार्तिक शुद्ध ९ मी गुरुवार दिन घटिक २४ तद्दिने समाप्त. यानुसार शके १७०६ म्हणजे सामान्यतः मूळ रचनेनंतर एका वर्षाच्या आंत प्रत झालेली आहे.

**ग्रंथविस्तार** :—या ग्रंथाचे एकूण अध्याय अकरा आहेत. एकूण पृष्ठसंख्या व ओवीसंख्या अध्यायवार पुढीलप्रमाणें आहे :—

| अध्याय | | ओवीसंख्या | | पृष्ठसंख्या |
|---|---|---|---|---|
| अध्याय १ ला— | ओवीसंख्या | १११ | – पृष्ठसंख्या | – ८ |
| अध्याय २ रा— | ,, ,, | १२८ | – ,, ,, | – ७ |
| ,, ३ रा— | ,, ,, | १५५ | – ,, ,, | – ९ |
| ,, ४ था— | ,, ,, | १३८ | – ,, ,, | – ७ |
| ,, ५ वा— | ,, ,, | १५६ | – ,, ,, | – ९ |
| ,, ६ वा— | ,, ,, | १२९ | – ,, ,, | – ९ |
| ,, ७ वा— | ,, ,, | १६९ | – ,, ,, | – १२ |
| ,, ८ वा— | ,, ,, | १५६ | – ,, ,, | – ११ |
| ,, ९ वा— | ,, ,, | २०७ | – ,, ,, | – (?) ( ११ ) |
| ,, १० वा— | ,, ,, | १८९ | – ,, ,, | – ९ |
| ,, ११ वा— | ,, ,, | २४१ | – ,, ,, | – १३ |
| ( गुरूपरंपरा क्रमासह ) | | | | |
| | | १७७९ | | १०५ |

अध्याय ९ वा अपूर्ण आहे. त्याची पहिली दोन व शेवटलीं दोन अशीं केवळ चार पानेंच आहेत. मधलीं नाहींत. शेवटच्या पानांवर पृष्ठक्रमांक नाहीं. ओवीसंख्येवरून सामान्यत: अकरा पानें असावींत असें वाटतें.

**ग्रंथविषय** :—या ग्रन्थांत प्रामुख्यानें व्यंकटगिरी व बंकटेश यांचें माहात्म्य वर्णिलें आहे, बंकट म्हणजे श्वेत वाराहाचा अवतार घेतलेला श्रीभगवानच होय. बंकट म्हणजे अमृतानें परिपूर्ण – "अमृत ऐश्वर्य सदोदित । नव्हे कधीं जें नाशिवंत ।" मुळांतील, "बंकारो वटबीजश्च कट ऐश्वर्य एवच । अमृतैश्वर्यसंघत्वाद्बंकटाद्रिरिति स्मृतः ॥ ही व्याख्या देऊन टीकाकार

बंकार म्हणजे अमृतबीज । कट ऐश्वर्य संज्ञा सहज ।
प्रथम मीळणी म्हणोनि गुज । व्यंकटाद्रि हे घडलें ॥ १ । ५६ ॥

अशी स्वतः ही व्युत्पत्ति करितो व इतरहि "करिती वित्पत्ती बहुसाल । युगानुयुगीं अनेकनामीं ॥" असें सांगून विविध नांवें सकारण–सविवरण देतो. तीर्थाद्रि, पुष्कराद्रि, वृषाद्रि, कनकाद्रि, नारायणगिरी, वैकुंठाद्रि, सिंहाचल, अंजनाद्रि, वाराहाद्रि, नीलपर्वत, इत्यादि. व्यंकटाद्रि हें नांव कां पडलें याचें कारण वर दिलें असून पुढें व्याख्यान केलेलें आहे व त्या निमित्तानें दोन कथाहि सांगितल्या आहेत.

ग्रन्थाचें अध्यायवार दिग्दर्शन वर केलें आहे. विषयाच्या दृष्टीनें या अध्यायांत, देवानें अवतार घेऊन पूर्व-पश्चिम; दक्षिणोत्तर जे दुष्ट पसरले होते त्यांचा विनाश केला, हें मुख्य सूत्र आहे. त्यासाठीं कथा आहेत. शेवटल्या अध्यायांत मात्र ग्रंथकारानें राजयोग, हठयोग, ज्ञानयोग, इत्यादींचें संक्षिप्त वर्णन, स्पष्टीकरण सूतांकरवी शिष्यांनीं विचारलेल्या प्रश्नांचीं उत्तरें म्हणून केलेलें आहे. सगळ्या ग्रंथभर ऋषिवर हे पृच्छक व व्यासशिष्य सूत हे उत्तर देणारे, अशा प्रश्नोत्तर-संवादरूपांत विवेचन केलेलें आहे, हा ग्रंथ म्हणजे "वाराह पुराणाच्या तीस अध्यायांचा संक्षेप आहे." संक्षेपाचें कारण "वाराह पुराणीचा विस्तार । अगोचर मति मूढां ॥ १ । १८ ॥ वंकटरमणाचे महिमान । तीस अध्याय केले कथन । ते विस्तारें वर्णित जाण । ग्रंथ गहन वाढेल ॥ १ । १९ ॥ म्हणोनि संक्षेपे ध्वनित कथा वाणिजेल ......"

**ग्रंथाधार** :—हा ग्रंथ "वेदव्यास जगन्नाथ । जगद्गुरू तो समर्थ । तदाधारे" केला आहे. कारण, "व्यासवाणी आदिशक्ति । आदिमाया जे भगवती । मातृका पटी अमृतमती । तदाधारें चालतसे ॥ २४० ॥ व्यासवाणीचा मथितार्थ । भाषामात्र हे प्राकृत । जाणोनि खर्परी नवनीत । टाकी पंडित हे न घडे ॥ ५ । ५३ ॥ गीर्वाण अथवा प्राकृतवाणी । परंतु तेथे चक्रपाणी । मृत्सुवर्ण घटीं पाणी । ज्यान्हवीचे ज्यापरी ॥ २४१ ॥" हा ग्रंथ, "संमत वाराह पुराणी । महामुनी श्रीव्यास" वराह पुराणाच्या आधारें व्यंकटगिरीमाहात्म्यावर आधारून लिहिला आहे.

'वंकटतरंगिणी' या ग्रंथाचा हा सर्वसामान्य परिचय होय. यांतील काव्य, उपमादृष्टांत, शब्द, व्याकरण इत्यादि इतर आणखी कांहीं बाबींचा उल्लेख करतां येईल, परंतु या सर्वांपेक्षां एक महत्त्वाची गोष्ट असून तिच्यामुळेंच या ग्रंथाकडे लक्ष आकर्षिलें जातें. ती म्हणजे या ग्रंथाच्या शेवटीं दिलेला " गुरुपरंपराक्रम " अध्याय ११· पत्र ९ ( १· ) व त्यांतून उद्भवणारे विचार. ही परंपरा अशी :--

आदिनाथ ( आदिगुरु ) हरिनाथ-रघुनाथ-मुकुंदभारती यतिवर्य-नृसिंह-
-भारती-जगन्नाथभारती-

सहजबोध ( गृहस्थाश्रमी ) निजानंद ( संन्यासधर्मी )

शिवकल्याण ( आत्मकुमर ) रंगबोध ( रंगनाथ ) ब्रह्मानंद
( गृहस्थ ) ( श्रीधरपिता )

( गोपाळादि-मधली परंपरा )

शिवराम ( ग्रंथकार )

सध्या आपलें विवेचन वंकटतरंगिणींतील पुढील गुरुपरंपरादर्शक ओव्यांपर्यंत मर्यादित ठेवूं :—

**जगन्नाथ भारती** यती । जो ज्ञानाचा पूर्णगभस्ती । जेणें उपदेशिले क्षिती । गृहस्थ आणि यतिवर्य ॥ ९ । १६३ ॥ सकळां माजी ज्ञानवंत । भक्ति विरक्ति प्रेम भरित । दोघे शिष्य चंद्रादित्य । जेंवि विख्यात जाहाले ॥ १६४ ॥ **सहज बोध** गृहाश्रमीं । **निजानंद** संन्यास धर्मी । ज्यासि उपमा द्यावया भूमी । अत्री तनय अवधूत ॥ १६५ ॥ भारती **निजानंदाचे शिष्य** । तेहीं जाले पै तादृश्य । **रंगस्वामी** ग्रहच्छ-वेश । इतर **संन्यास धर्माचि** ॥ १६६ ॥ विश्वविख्यात **रंगनाथ** । ज्याचि कविता अति समर्थ । भक्ति विरक्ती ज्ञानपंथ । जेणे केला सोज्वल ॥ १६७ ॥ **निजानंदा** पासूनि बहुतां । दीक्षा लाधली **संन्यासपंथा** । **ब्रह्मानंद श्रीधर पिता** । तोही शिष्य तदन्वयीं ॥ १६८ ॥ ब्रह्मानंद पूर्वाश्रमीं । पुत्र जाला श्रीधर स्वामी । ज्याची कविता विख्यात भूमी । हरि विजयादिक ग्रंथ ॥ १६९ ॥ असो आतां ग्रहस्ताश्रमीं । सह ( ज ) **बोध, कविचा स्वामी** । त्याची कथा श्रोत्र युग्मीं । श्रोती सादर परिसावी ॥ १७० ॥ त्यानंतर सहजबोधाची माहिती दिली आहे ). **सहजबोधाचा आत्मकुमर** । **शिव-कल्याण** योगेश्वर । वयसा सांत संवत्सर । दर्शन जालें अंबेचे ॥ २२५ ॥ उत्पन्न ज्ञानी जैसा शुक । त्याचि अपर प्रतिमा देख । ज्याचे ज्ञान आलोलेका कोणा जाय वर्णिले

॥ २२६ ॥ **गोपाळादि** त्याचे वंशीं । ज्ञान विज्ञान तेजोराशिं । तेथेचि उद्धव **शिवरामासी** । अत्री तनयासी जो साम्य ॥ २२७ ॥...... तेवि **कर्ता वक्ता श्रोता । सहजबोधचि** पै तत्वता । यथ तूटली अहंता । कवन कविता हे त्याचि ॥ २२३ ॥

शिवकल्याण हा सहजबोधाचा आत्मकुमर ( पुत्र ) खरा. त्याच्याच वंशांत गोपाळादि झाले. तेथेंचि उद्धव शिवरामासी. या सर्व विवेचनांत शिष्य म्हणून कोठेंच म्हटलेलें नाहीं. केवळ सहजबोध या गृहस्थाश्रमी व्यक्तीची वंशपरंपरा दिलेली आहे. शिवाय शिवरामानें बंकटतरंगिणि ह्या ग्रंथाचा कर्ता, वक्ता, श्रोता सहजबोधच असें म्हटलें आहे. इतरत्रही अध्यायांत व त्यांच्या शेवटीं सहजबोधांची कृपा म्हणून हा ग्रंथ झाला, असें म्हटलें आहे. योगेश्वर, शुकसमान, अलौकिक ज्ञानी, अवर्णनीय अशा शिवकल्याणा-बद्दल किंवा ज्ञानविज्ञान तेजोराशि गोपाळादिबद्दलहि इतरत्र कोठेंच कांहीं नाहीं. तेव्हां शिवराम हा सहजबोधाचाच शिष्य असावा, असें वाटूं लागतें. नातू किंवा पणतू म्हणावा फार तर. देचिकचरित्रांतही सहजबोध–रंगबोध– व शिवबोध असा क्रम आहेच.

**' बंकटतरंगिणी'तील इतर वैशिष्ट्यें**:-- मुकुंदराजांच्या एकंदर व्यक्तित्वाचा लेखकावर प्रभाव पडला होता असें दिसतें. केशव जयरामकृत " भक्तिरहस्य " या श. १७७९ मधील व विठ्ठल कवीच्या श. १७५० मधील ' धर्मपुरी–महात्म्या'वर आधार-लेल्या पौराणिक स्वरूपाच्या ग्रंथांत मुकुंदराज अथवा मुकुंदभट्ट यांच्याबद्दलची एक कथा दिली आहे. हरिनाथ आणि रघुनाथ हे काशींत असतां मुकुंदभट्ट जोतिषानें भिक्षा मागण्यास आलेल्या रघुनाथास " तुझें आज मरण आहे " असें भविष्य कथन केलें. रघुनाथानें हरिनाथास हें सांगितलें त्यांनीं आपल्या सामर्थ्यानें तें मरण चुकविलें. दुसऱ्या दिवशीं रघुनाथाला पूर्ववत् भिक्षेला आलेला पाहून, मरण कसें चुकलें व कोणीं चुकविलें ह्याचें मुकुंदभट्टाला आश्चर्य वाटलें. मरण चुकवूं शकणाऱ्या अति सामर्थ्यशाली महान व्यक्तीकडून त्यानें उपदेश घेतला. तेच ' मुकुंदराज ' होत. ( [१] )

अगदीं याच कथेचें स्वरूप ' बंकटतरंगिणीं'त आहे. सहजबोध यांचें पूर्वाभिधान कमलाजीपंत, वृत्ती ग्रामलेखन (कुलकर्णी), बेदरच्या सार्वभौम यवनानें कमलाजीपंतांच्या गांवीं दूत पाठविले व द्रव्याची मागणी केली. पाटील वगैरे पळाले, कमलाजी आवरा-आवर करीत असतांच धरले गेले, परंतु द्रव्याबद्दल कांहीं बोलेनात. म्हणून " चवलियांत मोट " बांधून ( ग्रामसमीप नदीचा ) मोठा डोह होता त्यांत टाकलें. यवन पाटिलाला धुंडावयास इतरत्र गेले. कमलाजीपंत हे गीतापाठ करीत. त्यामुळें जलदेवता त्यांना भक्षूं शकल्या नाहींत. शेवटीं आठव्या दिवशीं त्यांनीं नदीच्या ( डोहाच्या ) पाळीवर त्यांना आणून ठेविलें. घरच्या व गांवच्या लोकांना हें कळून ते आले, पण कमलाजी बोलेनात. त्यांची वाचा गेलेली. पाटी मागवून तीवर लिहिले " संमंध नाहीं तुम्हां आम्हां । जगन्नाथ भारती पासी नेउनि सोडा या देहासि ॥ " जगन्नाथ भारतीकडे

( १ ) श्री. ढेरे–गुरु. गोरक्षनाथ–पृ. १४६ व श्री. कुलकर्णी विवेकसिंधु पृ. ६२.

नेत असतांच त्यांनीं ( जगन्नाथ भारतींनीं ) अंतर्ज्ञानानें त्याचें आगमन ओळखलें. कमलाजीपंतांनीं दंडवत घालतांच त्यांना वाचा आली व " जेवि वसंत होता प्राप्त । " टाहो फोडित कोकिळ " तसे ते बोलूं लागले. जगन्नाथ यतिवर्यानें त्यांचें स्वागत केलें व १२ वर्षें त्यांनीं गुरुसेवन मोठ्या प्रेमभरानें केलें. ( वर्षाकाळीं नदी भरोन । चाले तेवि प्रेमभरें ) : " गोदावरीतटीं ग्राम । त्याचें **खेड** ऐसें नाम । जगन्नाथ मठ विश्राम । तेथें गोदावरी समीप असे ". त्या ग्रामांत दादोपंत प्रसिद्ध ज्योतिषी राहत असे. कमळाजीपंत भिक्षेस गेले असतां त्यांनीं आपल्या पत्नीस हळूंच सांगितलें, " याचें उद्यां मरण आहे तेव्हां त्याला आज चांगली भिक्षा घाल ". ही गोष्ट कमळाजीपंतांच्या कानीं पडली. ती जगन्नाथांनाहि अंतर्ज्ञानानें कळली. त्यांनीं मृत्युसमयीं त्यांना ( कमळाजीपंतांना ) " गंगातीरीं प्रातःसमयीं ।......गुरुक्रम यथाक्रम । शिरी ठेविले हस्त पद्म । करोनि प्राणाचा संयम । आत्मा नेला ब्रह्मांडी । " अशा प्रकारें--

" बारा वर्षें चतुर्विंशती । वर्षें वायुसाधना करिती । त्यासी न लभे ते स्थिति । जनन्नाथें गुरुवर्यें ॥ ११–२०६ ॥ क्षणार्धांत केलें सिद्ध । अवघा तोडिला भेदाभेद । **जगन्नाथ सहजबोध** । येकरूप जाहले ॥ २०७ ॥

अशा प्रकारें मृत्यूची वेळ टळली. दुसऱ्या दिवशीं कमळाजीपंत दादोपंतांच्या घरीं भिक्षेस गेले. तें पाहून दादोपंत चकित झाले. हें असें ज्या गुरुच्या सामर्थ्यानें घडलें, त्या जगन्नाथ भारतीच्या मनांत असें आलें कीं, दादोपंतांच्या दोन मुलींपैकीं वडील मुलगी कमळाजीपंतांस मिळावी पण दादोपंत कबूल झाले नाहींत. तेव्हां ती मुलगी गुरुक्रोधानें वारली. तेव्हां योग्य तो बोध घेऊन दादोपंतांनीं धाकट्या कन्येस कमळाजीपंतांस दिली. जगन्नाथांनीं त्यांना गृहस्थ धर्म आचरण्यास सांगितलें. " **औंढ्या**समीप दिशा प्राची । तेथें **टाकळी कुंभकर्णाची** । तया **ग्रामीं वस्ती** साची । सहकुटुंब तेव्हां कीजे ॥ " ह्या कथेचें मूळ वर दिलेल्या मुकुन्दराजांच्या कथेंत कसें आहे, तें मुकुन्दराज परंपरेंतील व्यक्तीच्याच बाबतींत कसें शक्य आहे, हें स्पष्ट करून सांगण्याचें कारण नाहीं.

या कथेप्रमाणेंच दुसऱ्याहि एका प्रचलित प्रसिद्ध घटनेचा प्रभाव लेखकावर होता. ती घटना म्हणजे ज्ञानेश्वर–चांगदेव भेट ( भिंत चालविणें इत्यादि ). त्याच कथेचें समजून–उमजून अनुसरण केलेलें आहे. त्याची ( लेखकाची ) ही जाणीव पुढीलप्रमाणें व्यक्त झाली आहे.

" चांगदेवाच्या भेटीलागी । पूर्वि ज्ञानेश महायोगी । भिंति चालवि लागवेंगी । तैसी परी हे जाली ॥ २२ ॥ सहजबोधांची पारीक्षा पहावी म्हणून येथें वडवाळ नागेश सिद्धांना आणलें आहे.

" बैसोनियां व्याघ्रासनीं । सर्पाचाचि चाबुक करुनि । भेटी पातला महामुनी ।

सहजबोधा जाणवले ॥ २१९ ॥ भिंतीवरी बैसले सहज । ××× हे निर्माण जाले काज । भिंतिमाते ऐके गुज । चाले भेटी स्वामीच्या ॥ २२० ॥ भिंती चालली ऐसे म्हणता । नवल जाले जन समस्तां । दोघे भेटोनि येकात्मता । ब्रह्मानंदी पावले ॥ २२१ ॥

ही भिंत जेथपर्यंत चालली तेथपर्यंतची भूमि अद्यापहि इनाम म्हणून सहजबोधांच्या वंशजांकडे असल्याचा उल्लेख आहे. मागें दिलेल्या परंपरेच्या संदर्भांत येथें एक अत्यंत महत्त्वाची गोष्ट अशी कीं, हीच टाकळी इनाम म्हणून शाहूनें श्रीधरास शक १६५० मध्यें दिल्याचाहि निर्देश आहे.[1]

मुकुंदराज–जैतपाळासंबंधीची कथाहि सविस्तर देऊन ( अध्याय ११ वा ) लेखकानें स्वतःची मुकुंदराजाशीं घनिष्ठता व्यक्तविली आहे.

वडवाळसिद्ध नागेश ही अजून विवाद्य व्यक्ति आहे. तिच्या संबंधीं प्रपंच नाहीं म्हटलें तरी बराच झालेला आहे. परंतु समाधानकारक निर्णायक माहिती अद्याप उपलब्ध नाहीं. पं. आवळीकर यांनीं 'अज्ञानसिद्धा' वरील लेखांत;[2] तर महाराष्ट्र सारस्वतांत डॉ. तुळपुळे यांनीं;[3] म. म. पोतदार यांनीं भा. इ. सं. मंडळ–वा. इ. वृत्तांत[4] बहिरा–जातवेदाच्या निमित्तानें, तर श्री. शं. श्री. देव यांनीं "संकट हरणी शिवग्रंथ" ह्या नागनाथ सिद्धाच्याच ग्रंथाच्या निमित्तानें.[5] तसाच "वरदनागेशी" व "गुरुशिष्यसंवाद" या दोन ( किंवा एकाच ) ग्रंथाच्या निमित्तानें;[6] वडवाळसिद्ध नागेश[7] याचा शिष्य जंगली फकीर सय्यद हुसेन याच्या निमित्तानें; असा एकूण बराच प्रपंच आजवर झालेला दिसतो. याशिवायहि अनेक जागीं झालेला आहेच. पण तो प्रस्तुत 'वंकटतरंगिणी'चा प्रमुख भाग नाहीं. त्यावर स्वतंत्र विवेचनच व्हावयास हवें.

वंकटतरंगिणीचें साहित्यदृष्ट्या विशेष उल्लेखनीय असें महत्त्व नसल्याचें प्रथमच सांगितलें आहे. नूतन-परंपरादिग्दर्शनाचा जो हेतु समोर ठेवून प्रस्तुत परिचयलेख लिहिला होता तें कार्य झालेलें आहे. मात्र हा ग्रंथ ज्याच्या कृपेनें, आशीर्वादानें, सामर्थ्याच्या बळावर लेखक लिहूं शकला त्या सहजबोधाबद्दल त्यानें दिलेला कृतज्ञता–परिचय पाहणें उचित होईल.

---

( १ ) डॉ. तुळपुळे–महाराष्ट्र सारस्वत ( पुरवणी ), पृ. १०१९; तसेंच श्री. चि. नी. जोशी–श्रीधर ( चरित्र ). ( २ ) पं. आवळीकर–जुनें वाङ्मय नवें संशोधन, लेख "अज्ञानसिद्ध" ( ३ ) डॉ. तुळपुळे–महा. सारस्वत (पुरवणी) पृ. ९२०. ( ४ ) भा. इ. सं. मंडळ, वार्षिक इतिवृत्त, श. १८३४ पृ. ६९. ( ५ ) भा. इ. सं. मंडळ, वार्षिक इतिवृत्त श. १८३५ पृ. ४०. ( ६ ) श्री. देव–रामदासी संशोधन, द्वितीय खंड, पृ. ६. ( ७ ) श्री. प्रियोळकर–मुसलमानांची जुनी मराठी कविता उत्तरार्ध पृ. २०.

वंकटतरंगिणी वर्णिली खरी. पण हें त्या मूळ सहजबोध गुरूचें सामर्थ्य होय. कारण तो सहजबोध--

" दीन जनांचा कृपाळ। चंद्रापरी जो शीतळ। अज्ञान तमहंता केवळ। सहस्र-किरण ज्यापरी ॥ २२८ ॥ त्याचा लाधूनि वरदहस्त। तो बैसोनि हृदयाआंत। स्वयें निर्माण करवि ग्रंथ। हें सामर्थ्ये तयाचें ॥ २२९ ॥ जें जें नून अथवा पूर्ण। ग्रंथीं दूषण की भूषण। त्याचा कर्ता तो आपण। जाला मन तो माझें ॥ २३० ॥ वेणु वाजे मधुर बहुत। तेणें प्रसन्न जन समस्त। होती परंतु तें सामर्थ्य। नोहे सत्य काष्ठाचें ॥ २३१ ॥ काष्ठ जड तें त्रिकाळ खोटें। त्यांतून मंजुळ ध्वनी उमटे। हे सामर्थ्य गोमटें। पवन फुंकी तयाचे ॥ २३२ ॥ तेवि कर्ता वक्ता श्रोता। सहजबोधचि पै तत्त्वता॥ येथ तूटली अहंता। कवन कविता हे त्याचि ॥ २३३ ॥ वेडा वांकुडा उत्तरीं। वाचा सुमनें पूजिला हरी। प्रीति पावो हृदयांतरीं। जो व्यापक सर्वांच्या ॥ २३४ ॥ समाप्त कर्ता श्रीगुरुनाथ। श्रोतीं आवडी ठेविजे येथ। प्रीति पावो रुक्मिणीकांत। भीमा तीर-विहारी ॥ २३६ ॥

[ वंकटतरंगिणीच्या कर्त्यानें आपल्या परंपरेंत शिवकल्याण, निजानंद, रंगनाथ व ब्रह्मानंद (श्रीधरस्वामींचा पिता व गुरु) यांचा समावेश केला आहे. वंकटतरंगिणीचा कर्ता शिवराम हा मुकुंदराजाच्या 'बोध'परंपरेंतील व सहजबोधांच्या शिष्यशाखेंतला होय. त्याच्या गुरुपरंपरेंत निजानंद, रंगनाथ व ब्रह्मानंद यांचा त्यानें केवळ परंपरेच्या अज्ञानानेंच समावेश केला आहे, हें उघड आहे कारण निजानंदादींची आनंदपरंपरा इतिहाससिद्ध आहे. तसेंच, शिवरामाच्या परंपरेंतील शिवकल्याण हा नित्यानंदैक्य-दीपिकाकार शिवकल्याणाहून वेगळा तरी असावा अथवा जर वेगळा नसेल, तर शिवरामानें त्याचाहि समावेश अज्ञानानेंच केलेला समजावा. प्रस्तुत संदर्भांत प्रा. मुंडी यांनीं त्या त्या व्यक्तींच्या इतिहाससिद्ध परंपरांशीं शिवरामानें दिलेली माहिती तुळून बरीच विस्तृत चर्चा केली होती. लेख आटोपशीर होण्यासाठीं अशी चर्चा आम्ही त्यांच्या संमतीनें गाळली आहे. - **संपादक** ]

---

# ९ भाऊसाहेबांची बखर : कांहीं भाग

**( श्री. ना. के. जोशी, पुणें )**

**प्रस्ताव :**—प्रस्तुत अपुऱ्या बखरीचीं ९ ते ३८ पानें तासगांव येथील श्री. महादेव रामचंद्र हिंगे यांजकडे होतीं तीं सातारा येथील प्रख्यात देशभक्त डॉ. वा. वि. आठल्ये यांचे-कडून मंडळाकडे आलीं. त्यांची नकल करून घेऊन तीं डॉ. आठल्ये यांजकडे परत केलीं.

या पानांतील विविध–विषयक मजकूर भाऊसाहेबांच्या बखरींतील तद्तद् विषयक मजकुराशीं ताडून पाहतां असें आढळून आलें कीं, बहुतेक प्रसंगांचा या प्रकरणांत संक्षेप असून भाऊसाहेबांच्या बखरींत तेच प्रसंग विस्तारानें सांगितले आहेत. यास एकदोन अपवाद आहेत ; तथापि बहुतेक ठिकाणीं भाऊसाहेबांच्या बखरीत असलेले शब्द, वाक्प्रचार व वाक्यरचना यांचा थोड्याशा फरकानें या प्रकरणांत समावेश असल्यानें तसेंच प्रसंगक्रमही दोहीकडे एकच असल्यानें या प्रकरणावरून भाऊसाहेबांच्या बखरीचा एखादा पाठ तर तयार झाला नसेल ना अशी शंका मनास चाटून जाते. मात्र एतद्विषयीं पक्कीं विधानें करण्यास प्रस्तुत बखरीचा याहून अधिक अंश मिळावयास पाहिजे. म्हणून येथें विशेष तौलनिक अभ्यास पुढें न मांडतां फक्त मूळ पाठ छापिला आहे.

## मूळ पाठ

दुराणियानी धरून नेहल्या ब्राह्मणाच्या तमाम बायकानी यमुनाढोहात उड्या घालून प्राण दिल्हे ते समई माहानदीने निदान वक्त जाणोन किती येकास वाट दिल्ही पलीकडे अंतरवेदात निघोन गेली अब्दालीने मथुरेची खराबी करून मजल दर मजल आग्र्यावर आले आसपास सुरुजमल जाट याचा मुलूक खराब केला गोघाटावर यमुनेचे तीरी शाहाचा मुक्काम जाहाला गाजदीखान वजीर समागमे कैदत होता तो प्रालब्धयोगे-करून डेरियाचे पाणीकडेस जाहले होते ते वेळेस गाजदी [खान*] याने रात्री जिवावर उधार होऊन पाणियात उडी घातली पोहवत व वाहात ऐसा आग्रियाचे किल्यानजीक येऊन बाहेर निघाला आणि दरवाजियाजवळ येऊन किलेदारास येऊन सूचना केली की आपण यकटा असे या गतीने आला आहे या वेळपरयंत मजला वाट देऊन जगविले परंतु आता तुम्ही किल्यात घेऊन जीव जगवणे आसे म्हणताच किलेदारानी गाजदीखान यास किल्यात घेतले गाजदीखान दगा करून आग्र्यात गेला हे अबदाली यास वर्तमान कळले नंतर फौजा सिध्ध करून आग्र्यावर चालून आला तो किला केवळ आसाध्य च्यार लक्ष फौज आलियाने आग्र्याचे काय होणार आहे मग किलेदारानी दम खाऊन फौज नजीक येऊन दिल्ही आणि यकदाच तोफास सरबती देऊन यकदाच बारासे गोळा पडताच फौजीस पळताच पुरे जाहाले आग्र्याचे कार्य होणे हे कठीण जाणोन जाटांचे कुंभीवर शाहा दिल्हा हिकडे दिलीच्या किल्यात नजीबखान रोहिला होता त्यानी गाजदीखान याचे कबिले चुलत्या व मावशा व मावळनी होत्या तितक्या रोहिलेयानी घरात घातले असे सर्वस्वे निमकहारामी जाहाला आंतरवेदीतील च्याळ...लक्षाचा मुलूक आपणाकडे नजीब-खान याने करून घेतला रोहिलेयाचा गुरू कुतुबशाहा होता याचेसमागमे पाच सात हजार फौज देऊन आगदी स्वस्थान हास्तगत केले मु[दु,]देखान रोहिला येकदर त्याचा चुलता आणिखी त्याचेच लेक केली त्या योगेकरून सासरा होय त्यास भागीरथीस पूल बाधोन गंगापार मुलूक काबीज केला तितका त्याचे स्वाधेन करून हिकडे सुरुजमल जाट याजवर शाहा दिल्हा होता तो दक्षणेतून राजश्री राघोबादादा व मल्हारराव होलकर

पनाससाट हाजार फौजेनिसी जेयेपूरचे रानात येऊन गिलज्याची बातमी कळताच तेथेच दम खाल्ला त्यास पुढे जावयास आवसान पडेनासे जाहले आणि दक्षणेतून फौज आली ही आबदालीस वर्तमान कळताच गिलज्याचे व सुरुजमल जाट याजपासी दाहा लक्ष रुपये घेऊन उरकते घेऊन त्वरेने निघोन आबदाली आपले स्वदेशास चालला दिलीचे स्वस्थान रोहिल्याचे हावाली करून त्यास इमान प्रमाण दिल्हे की आणिखी जे समई तुजवर भारी पडेल ते समई येऊन पोहचणे आसे त्यास आभय देऊन मजल दर मजल सरदेस गेला तेथे जाऊन समदीखान व कराळखान याजपासी (प) धरा हाजार फौज देऊन त्यासी तेथे ठाकिले तेथून लाहूरास गेले तो तेथील सदीद(प)खान बेग त्यास अगोदरच दूर केले होते तेथे अबदालीचा पुत्र तंवूरशाहा यास वीस हाजार फौजेनिसी लाहूरात ठेविले दिलीहून पुढे जातेसमई महमदशाहाची स्त्री मलकाजमनी तीही अगोदरच नजीबखान याचे हाती तिने आपली कन्या होती ती तंबुरशाहास दिल्ही ती व ही निघोन समागमे गेली पुढे येऊन दिलीची पातशाही करावी आसा विचार करून त्यास लाहूरात ठाकून आबदाली आटक उतरोन खेदरास गेला हे गडबडीचे वर्तमान हिदुस्थानातून अंताजी माणकेस्वर व सुरुजमल जाट व रामसिंग याचा पुत्र व राजेश्री दताजी सिंदे व जनकोजी सिंदे यास भासभास आला की हिकडे आबदालीने येऊन दिलीचे स्वस्थान व आणिखी आंतरवेदीचे वगैर आगदी हास्तगत केले हे वर्तमान कळलियावर जनकोजी सिंदे हागांम वैशाख मासी तीस हजार फौजेस नालबंदी दिल्ही तो खबर आली की गिलज्या आपले देशास गेला......तैसेच च्यार महिने जनकोजी सिंदे यानी घरी दम खाऊन राहिले तो हिकडे राजश्री राघोपतदादा व मल्हारराव होळकर जेयेपूरचे रान सोडून तमाम स्थानाचे खडण्या घेत दम खाऊन दिलीस जाऊन पोहोचले शहरपना मोकळा दरोबस्त यक लक्ष फौज आसावी याजकरिता रोहिल्याने शहरची आस्ता सोडून कमळगडावर सिलक गडीवर बळकाऊन राहिला शहरचा विनाशकाल याजकरिता जे याचे त्यानी वस्त्रे हारण करावी व मग पुढे करतुत्व करावे व जयेसिंगपुरा व बाहादरपुरा आणिखी येक दोन पुरे मारून चिंदीचोळा केला आणि किल्यास मोर्चे लाविले दोन किले आट रोज परयंत जुजले नजीबखान याने विच्यार केला की प्रस्तुत आपणास कोणी कुमकेस येत नाही त्यामधे रोहिला जबरदस्त कामातुर मोगलाई मसला आहे की लेक देऊन जावाई मारावा तैसा विच्यार करून मल्हारराव होळकर याजकडे आत्र लाविले की तुझा धर्मपुत्र आहे आजचे प्रसंगी मजला जीवदान देऊन अबरू रक्षावी असा त्याकडील सदर्प यताच मल्हारराव यास वीरश्री चढली की मी पुत्र म्हणून शरण आला त्या पुरशास खामाखाय रक्षावे म्हणोन आपले जागा विच्यार करून आपण व गंगोबा दिवाण ऐसे राघोबादादा याचे कचेरीस येऊन श्रीमंतास आर्ज केला की राजश्री राव कैलासवासी व नानासाहेब या उभयतासही आम्ही जो मनसुबा केला तो ऐकतच गेले त्याचे जागा आपण खावदच आहेत विनती करू ती गोष्ट मान्ये करावी आ[से म्हण]ताच दादा [साहेब]ही उमजले की मल्हारराव होळकर माग[ता]त जे नजीबखान याचा मागील विच्यार चितात

आणून दादानी जाबसाल केला की नजीबखान याची गोष्ट निराळी करून जीव मागितला तर तयार आहे आपले वचनाखेरीज आपणास अधिकोतर दुसरी गोष्ट काय आहे उतर ऐकोन मल्हारराव यानी मागती जाबसाल केला की मोड उगवताच खुडोन टाकिला मग मागणाराने काय मागावे ऐसा सदर्प दाखवून मल्हारराव यानी गाल फुगवून डेरियास गेले गेलियावर दादानी आपले कारभारी सखारामबापू आणिखी छोटेमोटे मिळवून मनसुबा केला की हिंदुस्थानचे सूत्र होळकराचे स्वाधेन आहे आजचे प्रसंगी याचे न ऐकावे तरी अवघे मसलतीस धका बसतो याजकरिता आजचे प्रसंगी कावसी करावे आणि मल्हारराव सागतील तैसे करावे की किला स्वाधीन जाहालियावर रोहिला याचा आभाव काय आहे भलती कफावत करून पिसाळले कुतरे मारावे जैसे तैसी मसलत करोन मल्हारराव याचे डेरियात गेले त्याचा बहुत प्रकारे गौरव केला की राव कैलासवासियाचे मागे सर्वस्वे वडील आपण आहा त्यास आपण वरचेवर रुसावे हा आर्थ जेव्हा आमचे चितात होते की रोहिला मात्रागमनी आहे ज्याचे आंन्न खाऊन त्यास टाळावे त्याचे घरावर उठोन त्याचेच कबिले घरात घातले पुढे आपण त्यास रक्षून परिणाम कैसा लागेल हे कळतच आहे आसो असा विच्यार आसोन आम्हावर वडीलपणे शब्ध ठेऊन रुसून आला त्यास काय म्हणावे याजवर मल्हारराव बोलली की ज्यासी बेमानी त्याच्या कामास यईल परंतु शरण यतील त्यास मरण चिंतावे आसा आर्थ नाही हे इतक्यावर खावंद आहा ऐकाल तर उतमच आहे न ऐकले तर त्यापेक्षा उतमच आहे ऐसे साफ उतर ऐकोन राघोबादादानी पोटसी धरून समजाविसी केली की तुम्ही वडील आहा आम्हास ज्या प्रो वर्तवाल त्या प्रो वर्तणूक करू शुभ आथवा आशुभ नानासाहेब तुम्हास विच्यारितील आम्ही जेऊन मात्र आसावे आपले विच्यारास जैसी मनसुबी येईल तैसे करावे म्हणून त्याचा गौरव करून डेरियास घेऊन आले उपरांतिक मल्हाराव यानी किल्यात वकील पाठऊन रोहिल्यास इमान-प्रमाण बेलभंडार देऊन बाहीर काढून आपले गोठानजीक उतरावयास जागा दिल्ही आमदशाहा पातशाहा याचे मसलतीने सिसळला होता त्यास मारून नवा आलमशाहा पातशाहास तख्ती बैसवा [वू] न शेहरात द्वाही फिरविली वजीर नावजला गाजदीखान यासी देऊन गैर नवानी मागती अंताजी माणकेश्वर यासा दिल्ही आदा पूर्ववतप्रो सुदामत करून पुढे लाहूरास जावयाचा निस्छय केला परंतु आधी नजीबखान याचे काम करून पुढे जे कर्ण ते करावे हा विच्यार करून संधी पाहातच होते तो यक दिवसी मल्हारराव भोजन करून निद्रा केली ही बातमी दादानी आणोन लटकी रांडापोराची कटकट लावून रोहिल्यावर हाला केली आसपास त्याची जावाण लस्कर लुटून जिवे मारावे तो मल्हारराव सावध जाहाला आणि दरम्यान येऊन उभा राहिला की आधी हाला मारून मजला मारावे मग रोहिल्यास मा ावे आसा विच्यार जाहाल्यावर याचा विचार चालेनासा जाहाला हाला माघारी फिरविली मल्हार-राव याचे चितात पुरते आले की श्रीमंतानी दगा देऊन मारावे आणि आपले तो इमान गुंतले कामाचे नाही मल्हारराव कचेरीस येऊन दादासाहेबास अर्ज केला की आम्ही

येक वेळा जोड मागितली आणि आपणही येक वेळा जोड दिल्ही तोडातून ताबूल ठाकिला त्याची मागती आशा धरून घ्यावयाचे अर्थ नाही त्याचे मारफतीचा मुलूख गेला आहे त्याचा इजारा आम्हाकडे लागला आहे त्याचे रुपयाची निशा आम्हापाशी घेणे चैघे कमाविसदार आहेत त्याचे मारफतीस येईल त्याप्रो यासी निरोप देऊन परगण्याप लावून देणे ऐसे ऐकोन दादानी चितात विच्यार केला की या विच्यारात ऐकावे तर कामाचे नाही रोहिल्यास या वेळेस जाऊन द्यावे मग पुढे पारपत्य करावयाचे मात्र करून निरोप दिल्हा रोहिल्याने विज्यारियाचे वचनप्रमाण मल्हारराव याचे हातून सरकारात भरले आणि आपण अमल करू लागला दोन तीन सालांत प्रांतात दोन तीन क्रोड रुपये पदरी बाळगोन दहा हजार फौज बाळगली हिकडे राघोबादादानी पुढे कूच करून मजल दर मजल जाऊन कुरुक्षेत्री जाऊन तेथील तीर्थविधी उतमप्रकारे करून त्या सरदेसी गेला त्या सरदेस सलादखान कतलबाज होऊन आणि कुमक पोहोचेनासी जाहाली मग बाहेर तसेच निघोन सलासला म्हणोन लस्कर लुटू लागला बहूत नग व रुपये यासो बेमुलूक तमाम पेढारी कुबेर जाहाले वगैरे लोकासी प्रालब्धानसार लूट सापडली खासा सलादखान पळत होता तो पेढारियानी धरून आणिला त्यासी वस्त्रे देऊन जिवानिसी सोडून दिल्हा सदीदखान याचा पुत्र बारा वर्शाचा होता त्यास आपणाकडे च्यार हजार फौजनिसी चाकरीस ठेवून सरदेत ठेविला तेथून कूच करून शरयू नदीतीरी उतरोन दस्तियाने मुलूख काबीज केला आणि लाहूरास गेले तेथे तबूरशाहा आबदालीचा पुत्र वीस हाजार फौजनिसी शाहारात होता यानी धास्तीने लाहूरास पळाला तो अटक उतरून पार जाहाला यानी आपले ठाणे लाहूरात घालोन रुपयाही उतमप्रकारे मिळविला सदीद(प) खान बाग(बेग)याची स्त्री आपणासनींध्य चाकरीस ठेविली तिजपाशी दादानी आपला येक ब्राम्हण व तुकोजी होळकर व मल्हारराव याचा पुत्र पाळक तो दोन हजार फौजनिसी त्या रानात टाकोन दक्षणच्या रोके डाला दिल्ह्या हिकडे जनकोजी सिंदे यानी फौज टेऊन घरी बसला होता तो श्रावण मासी आंविद निज्यामआली याचा व पेशवे याचा बिघ ( घा ) ड जहाला ते समई श्रीमंतापासी फौज सनींध्य नाही ते समई दताजी सिंदे व जनकोजी सिंदे यासी पुण्याहून सिरपाव दिल्हा आणि बहूत गौरव करून आज्ञा केली की आजपरयंत हिदुस्थानात भुमे व मारवाडी यांसारिखे काटक पराभवाते पाविले ते आम्ही कानी मात्र ऐकिले परंतु द्रिष्टीने पाहिले नाही देसी लाढाई मोगलासी होतच गेली परंतु देसी लढाईच प्रसंग पडला नव्हता व आवंदाही बिघड जाहाला धणी तुम्ही प्रसंगी असता फिकीर काय विश्वासराव तुमचे हाती दिल्हे आवंदाच मोगलावर माहीम जाहली त्यास मोगल आणि आपण पाहून घेणे म्हणताच जनकोजी सिंदे कुरणिशा करून अर्ज केला की आजपरयंत हिदुस्थानात ही पुण्येप्रतापे साहेबाचे कामास आला आणि पुढेही धण्याचा आर्शीवाद कामास येईल या गोष्टीची साहेबानी फिकीर न(?)करावी असा अर्थ नाही म्हणून गोष्टीचा अंगिकार करून निरोप घेऊन श्रीगोंदियास तमाम लोकास पत्रे पाठविली भाद्रपद

मासी मुहूर्त पाहोन निघोन पैठणावर गेले तोफा नाहीत जमा जाहाल्या तोपर्यंत अविंद याचा व त्याचा तह होताच उभयताचे अइक्यतेस यथिनासे जाहाले व विस्वासराव व जनकोजी सिंदे उजनी मागे ठाकून सडी फौज करून अवरंगाबादेभोवते तीन कोसावर राहिले पधरा रोज परयंत अवरंगाबादेभोवते दंगा करून तमाम बागेचा खराबा करू लागले बाहेर येऊन तोड देईनासा जाहाला म्हराठेयानी निकड करून आस्वीन-मासी फौजा सिध्ध करून लढाईस यतात असे वर्तमान आइकोन मोंगल पळून गेला बागत म्हराटेयाच्या फौजा राहिल्या होत्या सरदार वेंकटराव निबाळकर व जानराव निबाळकर व खाडगले आणिखी लहानथोर सरदार याच्या फौजा तयार होऊन बाग धरून उभे राहिले आपले कोटगिऱ्या ठाकोन मोगलावर घोडे घातले खासा जनकोजी सिंदे याचे तोंड त्याजवर बसविले विस्वासरावनी घोडे घातले ते वेळेस अविंदानी त्याची कुमक राखिली नाही कि यकास येक सोयरे आहेत निदान ते यकसूत्र होऊन आपणास त्रास देतील म्हणोन तसेच उभे राहिले ते वेळेस आविंदाकडील म्हराठे यानी चागलीच केली सोयरे जाहाले यकामेकाची घरी मेजवानीस जातील परंतु साहेबकामावर सोयरे म्हणावयासी येत नाही सिंदे याजकडील लस्करचे करोल सामान भारी वेकटराव यास तोड सुचेनासी जाहाली मांड धरून मार खात उभा राहिला तो नागोजी माने यानी विच्यार केला की हे सोयरे खवळला असता दम खाऊन राहावे असा अर्थ नाहीं म्हणोन जिवावर उदार होऊन आपले घरीसामानानिसी सिदे याजवर घातले परतु सिंदे करोल जबून मांड धरून मारीत मारीत उभे राहिले नागोजी माने दोन घटकापरयंत सिपाईगिरीची शर्थ केली परतु जीव थोडका आणि कोणी कुमकही न केली विटेचा मोहरा जिंदेस येऊन डुकर खळीस येऊन तैसा उखलेनासा जाहाला याची त्याची झोडधरणी बहूत जाहाली निज्यामआली व सलबातखान उभयता अंबारीत बसून तमाशा पाहातात याची व त्याची फारच हातधरणी जाहाली परतु आतीशा निसाने गाठले चितातील हेत पूर्ण होता गोळी लागोन ठार जाहाला नागोजीराव याचा प्राण घोडीवर निघोन गेला मग लोकानीही शर्थ करून मुडदा वहून नेहला तो साहेकाळ जाहाला मोगलाच्या चितात की किलाफ होता तोही निरशण जाहाला आविंद व नागोजी माने याच्या डेरियात येऊन बहुतप्रकारे समाधान केले आग्निप्रसाद दिल्हा तमाम मोगलात कळले की म्हराटेयात आपणापासी कोणी जुजले नव्हते नागोजी माने याने बहूत आश्चर्य केले असो याप्रो येहलोकी लोकीक कीर्त करून परलोकी साधन केले आगला क्षेत्रोधर्म पूर्वीला त्याज उपरातीक शाहारावर आणिखी येक दोन झुज होऊन मोंगल बाहर निघाला युध्धे करीत सिंदखेडास येऊन रामचंद्रराव जाधवराव यासी आपणात मेळऊन मागती गंगातीरास आले ते वेळेस सिंदे यानी येक दोन वेळा युध्ध उतम प्रकारे केले म्हराटे-यात याजप्रो मोगलासी युध्ध कोणी केले नव्हते गनीम भारी मोंगलासी सोसेनासे जाहाले तीन महिने युध्ध करून मोंगलानी शेला करून घेतला तो नानासाहेबही पुणियाहून लस्करात आले आवींद यक महिना यक जागा होते मग येक दिवसी

जनकोजी सिंदे यानी नानासाहेबास अर्ज केला की आवंदा फौज भारी ठेविली आपणास देसी राहणे पुरवत नाही हिंदुस्थानात जावयासी निरोप द्यावे न द्यावे असे होते तो सिंदे यानी अति आग्रह करून दताजी सिंदे यानी निरोप घेतला साखरखेडियावर श्रीमंताची फौज सोडून हिंदुस्थानाचे रोके तीन कोसावर मुकाम केला तेथून दताजी सिंदे सडेच चांभारगोंदियास जयाजी सिंदे याचे कन्याचे लग्न करावयासी गेले फौज समागमे जनकोजी सिंदे व रामाजीपंत दिवाण असे तीस हजार फौजेनिसी मजल दर मजल नरमदा पार होऊन माळवे प्रांतात गेले तेथे कोणी गिरासी होते त्याचे पारपत्य करून मुकुंदबारी उतरोन खचीवाड व अहीरवाडा सिंदेवाडा बुंदीकोट असे तमाम मुलुखाचे खडण्या घेत उदेपूरचे सुमारास गेले उदेपूरच्या राणाजींचा भाऊ सिवसिंग व सिसदव आडवे सात मजलीवर यऊन बहुमान घेऊन सालोसाल खडणी करार होती तिची निशां केली या उपरांतीक सिवसिंग यानी अर्ज केला की सिवपुरियाचा राजा राणोजी नौकर असता जे नवे घेतले बादक आहे आशा पाच सात गडिया घेऊन बे ( ई ) बदल होऊन स्वस्थानास उपद्रव दिल्हा आहे फौजेस खर्चास पाच लक्ष रुपेये देतो यवढ्या गड्या व सवनूरचे स्थान जे घेऊन तेथील राजेयासी तंबी पोहोचऊन प्रगणा हास्त करून देणे म्हणोन म्हणतातच जनकोजी सिंदे यानी मनसुबा केला की दताजी सिंदे देशास राहिले ते यावे लागतात पुढे जाऊन काय करावे यखादा जागा च्यातुरमास छयावणी करावी हे काय वावुगे आहे म्हणोन आंगिकारून ज्येष्ट व आषाढ परयंत समग्र दोन महिन्यात अवघे गड घेऊन दिल्हे कौलगडी तिजवर राणोजी भोइटे सरनोबत च्यार हजार फौजेचा सरदार मातबर मनुश होता त्यासी गोळी लागून ठार पडला त्याच्या समजाविसीस दोन लक्ष रुपये घेतले सिवपुरीचा राजाही सलियास आला त्यानी तीन लक्ष रुपये देऊन राणोजीचे व आपले सखेत्व करून घेतले श्रावण शु॥ १ प्रतिपदेस कूच करून येक मजल लस्कर गेले तो तिकडून राघोबादादा यास लाहूरची मोहीम करून येत होते दुसरे दिवसी त्याची व याची भेट जाहाली उभयता लस्करास तीन कोसाची तफावत होती येक रोजी दोही लस्करचा मुकाम होऊन राघोबादादा यासी डेरियासी घेऊन आले श्रीमंतांसी बहुमान हातीघोडे व जोहारवस्रे देऊन जनकोजी सिंदे यानी कुरणीशा करून अर्ज केला की लाहोरपरयंत मोहीम करून मुलूख काबीज केला असता आम्हास मोहिमेस जावयासी रान कोणते ती आज्ञा करावी ऐसे ऐकोन दादानी गौरव करून मनपूर्वक बोलले कीं आम्ही चवघे भाऊ म्हणवितो आम्ही त्रिवर्ग तुम्ही चवथे तुम्ही यासी अन्येथा असाल तर ईश्वर साक्ष म्हणून इमानपूरवक बोलोन पदर पसरोन जोड मागितली की पहिली शेवाचाकरी करीतच आलो पुढेही करू परंतु आम्हास प्रस्तूत येवढी यावी की नजीबखान रोहिल्यास आमचे हाताने मृत्यू नव्हता मल्हारराव यानीं पाट राखोन जिवानिसी सोडविला त्याचे भिडेस्तव टाळा दिल्हा आता तुम्हास या गोष्टीकरिता कोट रुपये सिबंदी जाहली तर आम्हांकडे लागली भरून देईन असेच रोहिल्याचे पारपत्य करोन त्यासी जिवे न सोडिता त्याची

राडापोरे ढाणकास द्यावी म्हणून बहूत अजीज होऊन पदर पसरून मागितले जनकोजी सिंदे यानी जावसाल केला की धणियाने पदर किनिमित्य पसरावा नजीबखान म्हणजे कोण जिनस अधिकोतर काय आहे याचे पारपत्य आपण आज्ञा केली हुकूम आम्हाकडे लागला ऐसे ऐकोन दादा बहूत सतोष होऊन जनकोजी सिंदे यास हाती व वस्त्रे देऊन निरोप घेतला दादा मजल दर मजल देशास आले मागाहून यका महिनियान मल्हारराव होळकर आले त्याचा याची अलीकडे चित शुध्ध नव्हते मारवाडचे सालियाचा त्याचा कुसूर धरून मल्हारराव याने चितात धरून बिजसिंग आतस्थ कागदपत्र पाठवीत होते हा किलाफ पुरताच जनकोजी सिंदे याचे चितात होताच जनकोजी सिंदे याचे चिती भेटावे हे नव्हते तो मल्हारराव याचे चितातील मनसुबा की आपले वृध्धपण जाहाले आपला येक नातूही शाहाणा नाही यास्तव सख्यत्व करून नातू हाती घ्यावा म्हणोन तीन च्यार दिवस गंगे बा तात्या येऊन बळेच रदबदली करून मल्हारराव याचे डेरियास येऊन भेट घेतली मल्हारराव यानी ममता दाखवून डोळियास पाणी आणोन नातवास हाती दिल्हे उभयता येकमेकास ममता अधिक अधिक करून कुफर तोडिला आट रोज पावेतो लस्करात समागमे होते मल्हारराव निरोप मागते समई जनकोजी सिंदे यासी बोलले की आमचे वृध्धपण जाहाले आणि तू जयाजीबावा आहेस आपला नातू मालोजीबावा तो दताजी बावा आता मानअभिमान तुमचा तुम्हाकडे लागला म्हणोन समाधाने निरोप घेतला ते समई जनकोजी सिंदे बोलले की सुभेदार आम्हास दादानी पदर पसरोन जोड मागितली की नजीबखान रोहिला याचे पारपत्य करावे त्यास जिवे न सोडावे म्हणोन बहूत काकुलती येऊन जोड मागितली याची काय आज्ञा म्हणताच मल्हारराव याने उतर दिल्हे की निक्षेत्री जाहाली कोणी भूमंडळात अथवा मोंगल भारी नाहीसा जाहाला अलिकडे नत्रे खुळ नजीबखान मात्र उभा राहिला यवढे बहुजापुरठाणे (बुजावणे) मोडून ठाकिले उपरांतीक श्रीमंतास तुमचे आमचे अगत्य काय तुम्हास व आम्हास धोत्रे धुवावयास लागतील आणि कमाविसदाराच्या हातून आटकेपासून रुपये आणवितील यवढे खुळ रक्षोन जे कर्णे त करावे ऐसे बोलोन उभयताही येकमेकास सिरपाव देऊन निरोप घेऊन निघोन कूच दर कूच मल्हारराव देशास आले जनकोजी सिंदे यानी मल्हारराव याची गोष्ट ऐकोन चितात मात्र ठेविले परंतु रोहिल्याचें पारपत्य कर्णे आवशक न करावे तरी स्वामीद्रोह पडेल पुढे जनकोजी सिंदे मजल दर मजल जेयेनगरची खडणी करून मारवाडात प्रांती जाऊन तेथील बदोबस्ती करून कूच दर कूच दिलीचे रोके चालले मागोन दताची सिंदे यका वर्शानी समागमे नारोशंकर चवदा हजार फौजनिसी नौकर टेऊन उजनीवर आले तो दादाची व त्याची भेट जाहाली ज्याप्रो जनकोजी सिंदे यास सागितले त्याजप्रो नजीबखानाविसी दताजी सिंदे यानीं सांगितले त्याजवरून विठल सिवदेव याच्या व दताजी सिंदे याच्या भेटी जाहल्या विठलराव यास विच्यारिले की दादानी व मल्हारराव यानी आटकेपरयंत मुलुख काबिज केला आतां तुम्हास मुलुख

गिरीस रान खाली कोणते आहे हे ऐकोन विठलराव बोलला कीं ते रानातील भूप मदतीस घेऊन भार्गीथीस पूल बाधोन अयोध्येपासून सुर्योजयेतदउला त्याजवर चालून जावे मुलूख सबळ आहे त्या रानात अद्यापि कोणाची तस्ती नाही तुम्हास रुपये मन मुक्ता मिळेल आणि फौज ही आमदानी होईल त्या वितरिक्त मुलूख काही राहिला नाहीं यानी प्रतिउतर केले की आता भुमया भारी कोण आहे कोणास हाती धरावे तेव्हा विठलराव बोलले की आजचे प्रसंगी नजीबखान भारी आहे त्याची पाठ थापटलिया सिकाय ( सिवाय ) आशा दाखऊन त्याचे हाती भागिरथीस पूल बाधोन गंगापार होऊन पलीकडील मुलूख काबीज कराव सुर्योजयेतदवला ( शुजाउद्दौला ) त्यास तंबी पाइ-चालविल्यावर थाडके तरी पाच कोड रुपये देईल ऐसे विठलराव यानी मनसुबा देताच दताजी सिदे याची गोष्ट प्रचितीस त्यास आली आजचे प्रसंगी सुर्योजयेतदवला मनसूरचा पुत्र याजपासी रुपया आहे येणेप्रो स्वराज्यात पइकेकरी कोणी मातबर नाहीं ऐसे जाणोन तोच मनसुबा पुरता ध्यानात आणोन उजनी सोडून दिल्ही आणि कूच दर कूच कावेरीयाचे मुकामास आले तो तिकडूनही मल्हारराव देशास येत होते तो त्याची व याची भेट जाहली कोव्याचे मुकामी उभयताचे अइक्यता होऊन उभयताही येकमेकासी सिदे होळकर यासी विच्यारिले की राजेश्री दादासाहेब आम्हास नजीबखान रोहिले याचे पारपत्याविशई फार फार पदर पसरून सांगितले आहे याचे काय आहे याची आज्ञा म्हणोन विच्यारिता मल्हारराव याने जाबसाल केला की आजचे प्रसंगी बुझावणे तवढेच आहे खुळ मोडलेयाने पेशवे कमाविसदाराचे हातून अटकेपासून पैसा आणवितील ऐसे कितीक प्रकारे अगोदर जनकोजी सिदे यास दर्शविलेच आहे व तुम्हासही सूचना केली आहे म्हणोन सांगताच दताजी सिदे यास अगोदरच विठलराव यानी हा मनसोबा दिल्हाच होता त्याजवर मल्हारराव यानीही तच सुचविले उभयताचा मनसुबा आइकयतेसच येतात दताजी सिदे याचे ऱ्हदयात तातकाळ गोष्ट ठसली प्रचीतीस आले की मल्हारराव यास देशास रवाना करून दताजी सिदे मजल दर मजल दिलीचे रोके जनकोजी सिदे मिळावयास चालले दिली अली-कडे च्याळीस कोस रेवडीवर उभयता चुलते पुतण्याच्या भेटी जाहाल्या समागमे देसीहून उभयताच कविले समागमेच आणिले होते यक जाहाली यानंतर बाहादरगडची मामलत चुकोन दिलीनजीक यमुनातीरी मजणूकाठियावर केला गाजदीखान वजीर बाहेर येऊन याच्या व त्याच्या भेटी जाहाल्या वजीरास घासदाणा पाच लक्ष रुपये मागो लागले ते समई वजिराकडील पातशाही कारभारी नांगरेमिळाने येऊन अर्जे केला की नजीबखान याचे पारपत्य कराल तर तुम्हास दाहा लक्ष रुपये देतो आणि जी आम्हापासी फौज आहे ती घेऊन तुम्हापासी येतो परतु नजीबखान याचे पारपत्य करणे जरूर तो अगोदर जनकोजी सिदे यानी खुरणिसी करून उभा राहून अर्ज केला की वजीरास म्हणतात ही गोष्ट खामखाय ऐकावी आर्जीचे च्यार रुपये मिळतात आणि खावदाचेही वचन मान्ये केलेसे होते बहुत नम्रतेने अर्ज केला प्रसंगी नारो शंकर व जानराव दामले [ वाबळे ]

आणखीही छोटेमोटे सरदार होते त्यानीही सांगावयाचे ते सांगितले की जनकोजी सिंदे सांगतात ते मान्ये करावे हीं गोष्ट उपयोगीचीच आहे अवघे याचे भिडेस्तव दताजी सीदे बरे म्हणोन बोलले परंतु चितात गोष्ट पुरती टसली नव्हती नागरेमेल याचे चितात सतोष होऊन विडे घेऊन शेहरात गेले वजीरास हा मजकूर श्रुत केला जनकोजी सिंदे याची सिफारस फारसी सांगीतली की उमर तो सोळा वर्षाचा परतु युधीस जैसा ब्रहसपति म्हणोन आपला हित गुणाणवाद बोलून वजिरानी मोहर्तानी डेरे दिल्हे तो बाहादरपुरियात पातशाई रिसाला व तोफा व गंजीचे गाड्या व हास्तनाला व सुतरनाला व बाजे होते ही बातमी दताजी सिंदे यास कळताच अगोदरच चितात भलताच विच्यार करून तह मोडावया विच्यारातच होता व जानराव वाबळे याजसमागमे च्यार हजार फौज देऊन तोफा पुरून ठेविल्या होत्याच उकरावयास लाविले हे वर्तमान गाजदीखान वजीर यास कळताच चितात विशाध आला की आम्ही सर्वस्वी याचे पदरी असता यानी परभारे न पुसता तोफा खाणविती तोफा काढावयाचे कारण काय तस्मात याचे चितात काही बेमानी आहे म्हणोन वजिरानी आपली पाच हजारा फौज व पायदळ होते ऐसी जमात घेऊन पातशाही रिसाल्यावर वजिरानी गनिमासी युध्य केले जानराव वाभळे यानी तवदस्ती कडनिकड करून वजीरावर घोडे घातले उभयता फौजेतील सवशेये मनुशे ठार जाहाली सिंदे याजकडील बाळोजी लवळे याचा पुत्र बळवतराव यास गोळी लागोन ठार जाहाला हे वर्तमाने लस्करात कळताच आणिखी च्यार हजार फौजनिसीं जिवाजी भोइटे कवठेकर चालोन गेले बाहादुरपुरा अगदी लाहोर दरवाजियापरयंत आगदी चिंदीचोळा केला वजीरानी चितात विचार केला कीं आपण हाटनिग्रह केलियाने परिणाम नाही गनिमाची इछा भारी असे समजून दताजी सिंदे याजकडे वकील पाठविला की दादासाहेब स्थापना करून गेले आहेत तुमचे खातरेस जसे यइल तैसे करणें म्हणोन सरनोबद आपले हावेलीस जाऊन स्वस्थ राहिले जानराव वाबळे याना आवध्या तोफा बाहेर काढल्या त्यातील नऊ लक्षाची येक आठ तोफा तीन लक्षाच्या खुशाली अैश्या दोन्ही तोफा करार करून गाडया तयार करून तोफा लस्करात आणित होते तो थोरली तोफ आटकळली चालेनासी जाहाली दोन हाती व च्यारसे बैलाच्या च्यार माळा लाविल्या परंतु तोफ चालेनासी जाहाली येक मनुशे आऊन दिल्हे देताच तोफ लस्करात येऊन दाखल जाहाली तोफा काढावयासी कारण काय म्हणाल तर मारवाडातील नागेर याचे पारपत्य मनोदयानरूप जाहले नव्हते याजकरिता तोफा काढून उजनीस लावून द्यावे ऐसा निस्चय केला तो सूरजमल जाट याजकडील वकील रूपराम कोठारी आपले खडनीचा गुता ठरवावयासी आला त्याने दताजी सिंदे यास अर्ज केला की खडणीपैकी च्यार लक्ष रुपये मजुरा द्याल तर आपण उजनीस तोफा प्रविष्ट करितो ते समई तोड करून दोन लक्ष रुपये खर्चोन तोफा उजनीस न पोहचलिया आशेरीजवळ चमेलीच्या खालियात तोफा तैशाच

राहिल्या तोफ भारी चवदा हात लांबी पिछयाडीस गर्भी आठ हात होती दिलीवर मुक्काम महिनाभर केला वज़िराजवळ पाच लेक्ष रुपये घेतले वजिराचे समागमे यावयाचा निस्चय राहिला समागमे अंताजी माणकेश्वर यास घेऊन लाहूरचे रोके चालले त समई जनकोजी सिंदे यानी चुलत्यास अर्ज केला की आधी यमुना उतरोन अंतरवेदीत जावे रोहिले याचे पारपत्य करोन मग पुढे कर्णे त करावे दताजी सिदे यानी उतर दिल्हे की लाहूर प्रांतीचा बदोबदस्त करून तिकडून माघारे फिरलियावर तेवढेच आहे म्हणून कूच दर कूच सोनपतावर जाऊन मुक्काम केला अगोदर जनकाजी सिदे यानी जेयेनगर प्रांतीहून } ग { गणोजी हालकारा प्रांती रवाना केला होता त्याजसमागमे पाच हजार फौज पुढे गेलीच होती आणिवी मागाहून शाबाजी सिदे याजसमागमे आठ हजार फौज देऊन त्याच प्रांतो लाऊन दिल्हे आपण मागाहून मुलखाच्या [ खडण्या ] करून हादेत चालले सरदेत सदीदखान याचा पुत्र होता तोही साबाजी सिदे याजसमागमे गेले ते तैनातीस दिल्हे आपण माघून कुरुक्षेत्री बारा रोज मुक्काम करून तेथील तीर्थविधी उभयतानी दंपत्यासुध्धा तुळा करून ब्राम्हणास दिल्ही तीर्थविधी यथाविधीने करून सरदेने शन्धूचे बेठावर यक महिना मुक्काम केला त्या रानातील बदोबस्त उतमप्रकारे करून साबाजी सिंदे व गणोजी कदम त्या रानात येऊन आपण माघारे फिरोन कूच दर कूच कुजेपुरीयावर आले तेथे खडणी घेऊन कुजपुरियानजीक घाट होता तेथे यमुना उतरोन आंतरवेदीत गेले तो च्यार हाजार फौजनसी गोविंदपत बुंदेले येऊन दाखल जाहाले जनकोजी सिदे याचे चितात नजीबखान याचे पारपत्य करावे नंतर दताजी सिदे याच्या विच्यारास त्यास रक्षोन कार्य करून ध्यावे म्हणोन गोविंदपत बुंदेले यास यकांती नऊन सांगितले की जैसे कळेल तैसे कर्णे रोहिल्यास भेटोस आणावे गोविंदपत बुंदेले याचा व रोहिल्याचा निस्चय उतम प्रकारचाच होता गोविंदपंताची पत्रे रोहिलियासही जाणपुरस्कर जाताच नजीबखान दोन हजार फौजनसी येकायकी आघाडीचे ढालेपासी उभा राहिला दताजी सिंदे यास चोपदारासमागमे मुजरा सागोन पाठविला हे वर्तमान जनकोजी सिंदे यास कळताच दताजी सिदे याजपासी येऊन कुरणिश्या केल्या आणि अर्ज केला की वैरी केवळ बहुत प्रयत्ने ससा भानवसी सापडतो तैसा सापडला आहे आशात माहाराजानी हुकूम आम्हास कराव याचे पारपत्य केलियाने स्वामीस सतोष होईल या रानातील कुफरही तुटेल याप्रो दताजी सिंदे यानी उत्तर केले की वैरी खरा परंतु शेरण आला त्यास मरण काय चिंतावे यास रक्षून याचे हातून कार्य संपादून घ्यावे मारून हातास येणे काय असे उतर होताच जनकोजी सिदे आपले जागा बहूत आर्जूदा होऊन आपले कचेरीचे डेऱ्यास येऊन छोटे मोटे उमराव त्यास सांगू लागले की नजीबखान याच्या पारपत्याविशई वडील तो तह देत नाहीत दादानी तो पदर पसरून जोड मागितली आणि आम्ही ही कबूल केली होती आता या गो

# १० ग्रँट डफचीं सातान्यांतील चार वर्षें (इ. १८१८-२२)

( डॉ. अ. रा. कुलकर्णी, पुणें )

फ्रान्समध्यें जेव्हां राज्यक्रांति घडत होती त्या वर्षी म्हणजे इ. १७८९ सालीं ग्रँटचा जन्म झाला आणि क्रांतिकालांत जन्माला आलेल्या या ब्रिटिशपुत्रानें भारतांत ब्रिटिशांची नवीन राजवट चालूं करण्यांत महत्त्वाची कामगिरी बजावली. ग्रँटचें विस्तृत चरित्र उपलब्ध नाहीं. पारसनीस यांनीं भारतवर्षांत ( अंक १७ पृ. १२ ) त्याचें एक त्रोटक चरित्र रेखाटलें आहे आणि ग्रँटच्या मराठ्यांच्या इतिहासाच्या नंतरच्या आवृत्तींमधून त्याच्या जीवनवृत्ताचें टिपण संपादकांनीं जोडलेलें आहे.

ईस्ट इंडिया कंपनीच्या सनदी नोकरींत प्रवेश करून घेण्याच्या इरायानें ग्रँटनें प्रथम कॅडेटशिप पत्करली व इ. १८०५ सालीं बॉम्बे ग्रेनेडिअर्स पलटणींत एक सामान्य सेनाधिकारी म्हणून त्यानें भारतप्रवेश केला. इ. १८१० सालीं एलफिन्स्टन पुण्याचा रेसिडेंट झाला. गुजराथेंत शौर्य गाजविलेल्या आणि फार्सी भाषेचें ज्ञान असलेल्या कॅप्टन ग्रँट या उमद्या तरुणानें त्याचें चित्त आकर्षून घेतलें. मराठ्यांचें राज्य खालसा करण्याच्या त्याच्या महत्त्वपूर्ण कामगिरींत कर्नल बर, कॅ. फोर्ड यांजबरोबरच जेम्स ग्रँटची वर्णी लागली. इ. १८१० ते १८१७ या कालांत त्यानें एलफिन्स्टनचा विशेष विश्वास संपादन केला असला पाहिजे. त्याखेरीज ब्रिटिश राजवटीची मुहूर्तमेढ रोवण्याची बिकट कामगिरी एलफिन्स्टननें त्याच्यावर सोंपविली नसती.

इ. १८१८ ते १८२२ या चार वर्षांत सातान्यांत राहून ग्रँटनें दोन गोष्टी साधल्या. पहिली, ब्रिटिश राज्यपद्धतीचा मराठी शासनव्यवस्थेंत प्रवेश आणि दुसरी, मराठ्यांच्या इतिहासाचा कच्चा आराखडा केला.

सातान्याचा रेसिडेंट म्हणून ग्रँटची जेव्हां नेमणूक झाली तेव्हां तो २९ वर्षांचा होता. त्याजकडे सोंपविण्यांत आलेली कामगिरी अत्यंत नाजूक स्वरूपाची होती. राजाची मर्जी सांभाळून त्याला ब्रिटिश शासनपद्धतीच्या मार्गावर आणण्याचें बिकट काम ग्रँटच करूं शकेल असा एलफिन्स्टनला भरवंसा होता; म्हणून त्यानें त्याला हाताशीं धरलें होतें.

दि. ११ फेब्रुवारी १८१८ रोजीं सातान्याच्या राज्यासंबंधीं एलफिन्स्टननें जो जाहीरनामा काढला तो म्हणजे बाजीरावावरील एक आरोपपत्रच[१] (Indictment)

१ "Satara Territory" Selections from the Records of the Bombay Govt. No XLI, New Series ( 1857 ) pp 46–47.

आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. " या मसनदीवर बाजीराव आल्यापासून त्याचा प्रदेश दुहीला आणि फुटीला बळी पडला आणि लोकांचें संरक्षण करूं शकेल असें समर्थ सरकार राहिलें नाहीं " असें विधान करून इ. १८०३ पासून ब्रिटिशांशीं झालेले करारमदार त्यानें कसे मोडले आणि त्यामुळें नाइलाजानें कंपनीला त्याचा सर्व प्रदेश कसा काढून घ्यावा लागला याचा त्यांत पाढा वाचला आहे. पेशवा आणि त्याचें सरकार यांच्या दुष्कृत्यांशीं संबंध नसलेल्या सातार्‍याच्या राजाला या काबीज केलेल्या प्रदेशापैकींच कांहीं भाग देण्यांत येईल व सातारचें राज्य निर्माण करण्यांत येईल अशी घोषणा त्यांत केली आहे.[२]

सातार्‍याची राज्यनिर्मिति हा एलफिन्स्टनच्या मुत्सद्देगिरीचा विजय म्हटला पाहिजे. असें राज्य निर्माण करणें हें ब्रिटिश राजवट हिंदुस्थानांत स्थिर करण्याच्या दृष्टीनें आवश्यक होतें. तसें केलें नसतें तर शिंदे, होळकर आदींनीं बंड पुकारलें असतें, ब्रिटिश सत्तेला सर्वत्र शह बसला असता आणि पत्त्यांच्या बंगल्याप्रमाणें ही सत्ता संपुष्टांत आली असती. म्हणून जें आपणांस पचणार नाहीं तें सेवन करणें हें अप्रस्तुत होय असें तो म्हणतो. इ. १८१९ सालीं आपल्या मित्राला लिहिलेल्या एका पत्रांत त्यानें आपली भीति व्यक्त केली आहे. तो म्हणतो, " आपलें ब्रिटिश साम्राज्य भारतांत दीर्घकाल टिकणार नाहीं हा खोटा ग्रह ( Prejudice ) नसून रास्त तर्क ( Reason ) आहे.[३] "

तसेंच पेशव्याला पदच्युत करण्यापासून जर सर्वांत महत्त्वाचा कोणता फायदा असेल तर तो म्हणजे मराठे सरदारांच्या संघाला ( Confederacy ) त्यामुळें तडा जाईल.[४] कारण असें केल्यानें त्यांना एकत्रित आणणारा दुवाच नष्ट केल्यासारखें होईल असें त्याचें मत होतें. इ. १८१८ च्या जाहीरनाम्यानें छत्रपतीची गादी कायम ठेवली आणि लोकांना सामाजिक, धार्मिक व आर्थिक स्वातंत्र्याचें आश्वासन व अभयदान दिलें. पुढें इ. १८५७ सालीं व्हिक्टोरिया राणीनें जो जाहीरनामा काढला त्याची ही रंगीत तालीम होती असें म्हणावयास हरकत नाहीं.

सातार्‍याच्या राज्याचें कायदेशीर स्वरूप काय होतें हें निश्चितपणें सांगणें कठीण आहे. दि. २५ सप्टेंबर १८१९ रोजीं प्रतापसिंह आणि कंपनी सरकार यांमध्यें तहनामा अथवा करारनामा झाला त्यांत असें नमूद केलें आहे कीं, " सातार्‍याच्या गादीचें पुरातनत्व लक्षांत घेऊन, कंपनी सरकारनें ठरविलें आहे कीं, सातार्‍याच्या राजाला आपल्या कुटुंबियांसह मानानें आणि सुखानें राहतां येईल इतकें सार्वभौमत्व राहील ( Sovereignty sufficient for the maintenance of his family in comfort and

---

२ Life of Mount Stuart Elphinstone ( London, 1884 ) by Colbrooke Vol II pp 40–44 ३ Ibid p. 72

४ Poona Residency Correspondence ( PRC ) Vol.XIII p. 399

dignity)[५]. हें असलें सार्वभौमत्व स्वीकारतांना राजाकडून एका कलमान्वयें असें आश्वासन घ्यावें लागलें कीं, हा मुलूख आपण ब्रिटिश सरकारचे एक दुय्यम सहकारी म्हणून धारण करीत असून ( hold the territory in subordinate co-operation with the British Goverment )[६] राज्यकारभाराच्या सर्व बाबतींत आपण ब्रिटिश वकिलानें दिलेल्या सल्ल्याप्रमाणें वागूं. सार्वभौमत्वाच्या रूढ कल्पनांत प्रतापसिंहाचें हें सार्वभौमत्व बसत नाहीं. नंतरच्या काळांत जी ब्रिटिश पॅरामाउन्ट्सीची कल्पना उदयाला आली तिची सुरवात ही अशी झाली असावी.

प्रतापसिंहाला गादीवर बसवावयाचें, त्याच्या राज्याच्या सरहद्दी ठरवून द्यावयाच्या, त्याचें जरीपटका निशाण फडकूं द्यावयाचें आणि असें करीत असतांना अशी दक्षता बाळगावयाची कीं जुनें छत्रपतींचें राज्य आलें, असें कोणाला वाटणार नाहीं. प्रजेच्या मनावर असें कायम ठसविलें पाहिजे कीं, प्रतापसिंह राजा असला तरी सर्वोच्च अधिकार कंपनी सरकारकडे आहेत.[७]

या राज्यनिर्मितीनें एलफिन्स्टनपुढें नवीनव समस्या निर्माण झाल्या. या प्रदेशांत सुस्थिर अशी सनदी राजवट, शांतता आणि सुव्यवस्था निर्माण केल्याखेरीज ब्रिटिशांची सत्ता मूळ धरणार नव्हती, लोकांचा विश्वास संपादन करूं शकणार नव्हती. पूर्वीच्या राजवटीपेक्षां ही नवी राजवट बरी आणि ती तशीच चालू राहिली पाहिजे असें लोकांना वाटणें आवश्यक होतें. स्वतंत्र राज्य निर्माण केलें, पण राजा राज्यकारभारास अनभिज्ञ असल्यामुळें कांहीं काळपर्यंत त्याला ब्रिटिश वकिलाची मदत घ्यावी लागेल. स्वतंत्र रीत्या राज्यकारभार करण्यास तो योग्य झाला म्हणजे सर्व सूत्रें त्याच्या हातीं सुपुर्द करण्यांत येतील. अशा तऱ्हेची सिद्धता करण्यांत आली आणि हा सारा खटाटोप लोकांच्या हितासाठीं आणि भरभराटीसाठीं करावयाचा आहे अशी लोकांची कल्पना करून दिली गेली.

साताऱ्याचें राज्य ब्रिटिश नेतृत्वाखालीं स्थापन करण्याची सारी कामगिरी ग्रँटकडे सोपविली होती. राजकीय दृष्ट्या ब्रिटिश सत्तेच्या वर्चस्वाखालीं असूनही राजाला असें वाटलें पाहिजे कीं, अंतर्गत व्यवहार आणि प्रजेवरील सत्ता या बाबतींत आपण स्वतंत्र आणि मुक्त आहोत.[८] येथें एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, प्रतापसिंहाचा उल्लेख नेहमीं "राजा" असा केला आहे, छत्रपति असें चुकून सुद्धा त्याला म्हटलेलें नाहीं.

साताऱ्याचा राज्यकारभार कसा करावयाचा यासंबंधीं विस्तृत सूचना एलफिन्स्टननें ग्रँटला दिल्या होत्या. राजाचा विश्वास संपादन करणें, त्याच्या हिताबद्दल विशेष

५. Treaties, Engagements and Sanads, Vol. II by Aitchison p. 443 ६. कित्ता. ७. Social policy and social change by Ballhatchet pp. 19–20. ८. PRC Vol. XIII, p 437.

जागरूक राहणें, त्याच्या कुटुंबांतील सर्वांशीं प्रेमानें वागणें आणि राजघराण्याशीं आपलें संबंध बिघडणार नाहींत याची काळजी घेणें ही त्यांत एक महत्त्वाची सूचना होती.[९] ग्रँटची आणि प्रतापसिंह व माईसाहेब यांची ओळख एलफिन्स्टननें, त्याची रेसिडेंट म्हणून नेमणूक होण्यापूर्वींच, राजा सातान्यांत येण्याआधींच म्हणजे चंदनवंदन किल्ल्यावर करून दिली होती. तेव्हां तो म्हणतो, "आम्हांस आपलेकडील वकिलीचें काम सांगितलें. माईसाहेबांनीं महाराजानें व भाऊसाहेबांनीं जें बोलणें तें आम्हासी बोलावें, परभारें बाळाजीपंताकडे (नातू) कोण्ही बोलूं नये. बाळाजीपंतास आम्ही आपलेजवळ ठेऊन घेतलें आहे तें कागदपत्राची माहितगारी[साठीं] व न समजेल तें विचारणें तें आम्ही विचारूं तुम्ही परभारें बोलू नये."[१०] म्हणजे अगदीं पहिल्या सलामींतच ग्रँटनें राजानें कसें वागावें हें सांगून टाकलें आणि नेटिव्ह असिस्टंट बाळाजीपंत नातू याच्या कामाचें सत्य स्वरूप उघड केलें.

असें असलें तरी ग्रँटनें राजाची दृढ मैत्री संपादन केली होती हें इंग्लंडमध्यें स्थायिक झाल्यानंतर १८३३–३५ पर्यंत त्यानें प्रतापसिंहाशीं जो उपयुक्त पत्रव्यवहार केला त्यावरून लक्षांत येईल.[११]

राजाचा वार्षिक खाजगी खर्च तीन लाखांहून अधिक मंजूर करूं नये अशी एक सूचना एलफिन्स्टननें केली होती. याहून अधिक खर्च चालणार नाहीं असा धाक त्याच्या मनांत निर्माण करावा असें सांगण्यांत आलें होतें. ही बाब फारच नाजूक होती. राजानें मुळीं मागणीच ५० लाखांची केली; नंतर ती वीस लाखांवर आली. परंतु ग्रँटनें जेव्हां एलफिन्स्टनचा आंकडा सांगितला तेव्हां राजानें तें जमणार नाहीं असें निक्षून सांगितलें. पुढें बाळाजी नातूच्या मध्यस्थीनें ग्रँटनें हें प्रकरण तीन लक्ष बारा हजारांवर मिटविलें.[१२]

राज्यकारभार स्वतः पाहावा आणि असें करीत असतांना सर्व गोष्टी राजास समजावून द्याव्यात, त्याच्या इच्छेप्रमाणें वागावें व त्याच्या ठिकाणीं काम करण्याची अभिरुची व राज्यव्यवस्थेच्या तत्त्वांचें ज्ञान उत्पन्न करावें अशी एक सूचना ग्रँटला दिली होती. राजाची मर्जी संपादन करीत असतांना व त्याला राज्यकारभार करूं देत असतांना प्रत्यक्षांत ब्रिटिश सरकार सर्वाधिकारी आहे याची त्याला सतत जाणीव करून द्यावयाची होती. "तसें झालें नाहीं तर हें नवें राज्य भस्मासुरासारखें आपल्यावरच उलटलें असतें." अशी एलफिन्स्टनला भीति होती.[१३]

ग्रँटनें राजाला कसें कार्यप्रवण केलें याची कल्पना प्रतापसिंहाच्या रोजनिशीवरून येईल. "नित्यनेम करून मग अदालतींत जाऊन उत्तर देणें तीं देऊन हिसेब लिहून नंतर ग्रँटाची गाठ पडून बोलणी झाली ती कलमे" अशी प्रस्तावना करून दैनंदिनी

९. PRC Vol. XIII p 437. १०. डेक्कन कॉलेज ऐतिहासिक संग्रह रु. नं. ५५ का. १२ क्र. १. ११. Journal of Indian History Vol. XV part II No. 44 (1936) १२. Social Policy etc. p 21. १३किता p. 20.

त्यानें लिहिली आहे. यावरून कशा प्रकारची शिस्त ग्रँटनें त्याला घालून दिली होती याची कल्पना येईल. इ. १८१८ ते १८२४ या कालखंडांत राजाच्या अंगीं ही शिस्त इतकी बाणली होती कीं, राजवाड्यांतील एका खोलींत खुर्चीटेबलावर बसून हा शिवाजीचा वंशज स्वतःच्या हातानें पत्रें आणि रोजनिशी लिहितो हें पाहून एलफिन्स्टनला आश्चर्य वाटलें. " मला भेटलेल्या मराठ्यांत प्रतापसिंह हा एक अत्यंत सुसंस्कृत मराठा आहे" असें तो इ.१८२६ सालीं लिहितो.[१४] इ.१८२७ सालीं कर्नल ब्रिग्जचें मत देखील तसेंच होतें. ग्रँटच्या नेतृत्वाखालीं राजानें किती तत्परतेनें राज्यकारभार केला हें खरोखरच आश्चर्यकारक आहे आणि त्यानें घालून दिलेली पद्धत ज्या सातत्यानें तो पाळीत आहे तें खरोखरच त्याला भूषणावह आहे[१५] असें कर्नल ब्रिग्जनें आपलें मत नोंदविलें आहे.

इ. १८१८ सालीं साताऱ्यांत ब्रिटिश नेतृत्वाखालीं प्रस्तुत केलेली नवी राजवट सुकर व्हावी म्हणून दि. १४–४–१८१८ रोजीं राजानें दोन जाहीरनामे काढले. पहिल्या जाहीरनाम्यांत सर्व अधिकारी आणि रयत यांना बजावलें आहे कीं, " मी इंग्रज लोकांवर विश्वास व भरवसा ठेऊन त्यांच्या छावणीत गेलों, तेथें त्याची व आमची परस्पर दोस्ती घडून आली आहे. ह्याकरिता इतःपर कोणी बाजीरावाशीं कोणत्याहि प्रकारचा संबंध ठेवूं नये व त्यांशीं पत्रव्यवहार करूं नये. जे कोणी ऐकणार नाहींत त्यांचें उत्पन्न सरकारांतून जप्त केलें जाईल व त्यांस योग्य शासन होईल. "

दुसऱ्या जाहीरनाम्यांत " क्याप्टन ग्रांट बहादूर ह्यांजकडे आम्ही सर्व राज्यकारभार सोंपविला आहे, ते आमच्या राज्याचें कल्याण व भरभराट होईल अशा रीतीनें राज्यकारभार चालवतील "[१६] असें आश्वासन दिलें आहे. अर्थात् हे दोन्ही जाहीरनामे एलफिन्स्टनच्या सांगण्यावरून काढले आहेत हें उघड आहे.

ग्रँटला दिलेल्या सूचनांपैकीं आणखी एक महत्त्वाची सूचना म्हणजे प्रस्थापित व्यवस्थेंत विशेषतः सामाजिक व्यवस्थेंत फारसा बदल न करणें. सत्तांतराच्या काळांत किमान सामाजिक बदल घडून येणेंच इष्ट होय. सत्तेचा मोठ्या प्रमाणांत दुरुपयोग केला जात असेल अथवा लोकांच्या हितसंवर्धनार्थ असा हस्तक्षेप आवश्यक असेल तरच तो करावा. ब्रिटिशांचें हें धोरण त्यांच्या परंपरेला आणि सनातनवृत्तीला धरूनच होतें.

मराठ्यांची शासनपद्धति आणि इतर व्यवस्था शक्य तितक्या प्रमाणांत अबाधित ठेवली पाहिजे. ती लाचलुचपतीची असली आणि तितकीशी कणखर नसली तरी ती येथील परिस्थितीला लागू पडणारी असल्यामुळें आणि तिनें या भागाचा

---

१४. Colbrooke II pp. 187–88 १५. Social Policy etc. p. 241.
१६ ( भारतवर्ष : पारसनीस १७।१८ ).

विकास साधला असल्यामुळें, तींत आवश्यक तेव्हांच आणि तेथेंच सुधारणा करावी असें एलफिन्स्टनचें धोरण होतें.[१७]

राज्यशासनांतील बारीकसारीक गोष्टींत लक्ष घालून ( details of administration ) त्यांतील दोष क्रमशः दूर करून, लाचलुचपतीला आळा घालून, एक प्रकारची शिस्त निर्माण करण्याची कामगिरी ग्रँटकडे होती. इ. स. १८१८ ते १८२२ या चार वर्षांच्या काळांत एलफिन्स्टनच्या या कल्पना कितपत प्रत्यक्षांत उतरल्या आणि राज्यकारभारांत ग्रँटनें कसें लक्ष घातलें होतें हें कागदपत्रांवरून समजून घेणें उद्बोधक ठरेल. इ.१८२७ सालीं लिहिलेल्या एका पत्रांत एलफिन्स्टन म्हणतो, "साताऱ्याच्या राजाचें वर्तन आणि त्याच्या शासनाचें यश यांनीं आमचे अपेक्षेपेक्षां अधिक समाधान केलें आहे." कांहीं वेळां प्रेमानें, कांहीं वेळां धाक दाखवून ग्रँटनें हें यश मिळविलें होतें आणि म्हणूनच एलफिन्स्टन म्हणतो, "मैत्रींत तूं थोर आहेस, आणि त्याचबरोबर तुझा कोप भयानक आहे." ( you are great in your friendship and you are terrible in your wrath )[१८]

उत्कृष्ट महसूलव्यवस्था, काटकसरीचें शासन, न्यायदान आणि शेतकऱ्यांना प्रसंगीं सारासूट ही ग्रँटच्या कार्याची चतुःसूत्री होती. इंग्लंडहून प्रतापसिंहाला लिहिलेल्या पत्रांत याच मार्गदर्शक तत्त्वांचा त्यानें वारंवार उल्लेख केला आहे.

महसूलपद्धतीची योग्य पायावर उभारणी करण्याकरितां म्हणून ॲडम्स या अधिकाऱ्याच्या मार्फत त्यानें जमीन मोजणीच्या कार्याला प्रारंभ केला होता. खर्चांत काटकसर झाली पाहिजे असा त्याचा सतत आग्रह असे. बळवंतराव चिटणीसांच्या लेकीच्या लग्नासाठीं कांहीं रक्कम द्यावी असें महाराजांनीं ग्रँटला सुचविलें तेव्हां तो सांगतो, " आसी लग्ने फार होतील, हा दस्तूर पाडू नये व म्हाराजाचे राज्य हवाली जाहाले म्हणजे असाच खजिना देतील लोकास." शेवटीं आपलें दातृत्व सिद्ध करण्यासाठीं महाराजांना आपल्या खाजगींतून दोन हजार रुपये द्यावे लागले.[१९]

ग्रँट हा मोठा करारी आणि जबरदस्त माणूस होता. एकदां एक विशिष्ट घोडा खरेदी करण्याविषयीं राजाला निरोप पाठविला असतां, तो " पाहून घेऊ " असें उत्तर घेऊन विठोबा दिवाण आला. हें उत्तर ग्रँटला रुचलें नाहीं. तो रागावला आहे हें दिवाणानें चटकन् ताडलें आणि सत्वर त्यानें आपलें बोलणें सुधारून घेतलें. तो म्हणतो, " माहाराजाचे म्हणणे की तुमचे पारखीस आला असल्यास आमचे पसंत आहे. "[२०]

---

१७. Social Policy etc. p. 234.  १८. Social Policy etc. p. 21.

१९. प्रतापसिंहाची ( रोजनिशी क्र. ५ पृ. १९ : ता. २२·१०·१८२१ ) अप्रकाशित : पेशवे दप्तर. २० रो. क्र. १ पृ. ३६, सन १८१९.

दैनंदिन राज्यकारभार कसा चालत असे याची कल्पना देणारे कांहीं कागदपत्र डेक्कन कॉलेजच्या पारसनीस संग्रहांत आहेत. पत्रव्यवहारासंबंधीं ग्रँटनें असा नियम घालून दिला आहे कीं, "मोर्तब सर्व कागदावर चिटणीसांनी करावा. सर्व कागदपत्र येतील त्याचे लखोटे फोडून वाचून दाखवून उत्तर देणें हे त्याणी करावे दिवाण (समक्षास) असल्यास उतम नसल्यास चिटनिसानी त्याची उजूर कोणतेहि काम करण्यास धरू नये [२०अ]

ग्रँटला विचारून जीं कामें करावयाचीं त्यांची एक यादी तयार केली जात असे आणि तींतील प्रत्येक कलमावर त्याच्याकडून हुकूम घेतले जात; मग तें कलम कितीही सामान्य असो. उदाहरणार्थ "कुरणांत गुरे चरावयाची पंधरा दिवस अवकाश करावा" या कलमाखालीं ग्रँटचा निर्णय असा कीं, "पंधरा दिवस गवत देवावे आम्हापासी घास नाहीं, पुढें कुरणांत रवानगी व्हावी."[२१] अथवा "बडे साहेब आले पुणियास त्यास फराळास वगैरे काही पाठवावे त्यास आरले सलेस आले तरी पाठवू" यावर "पाठवावे" अशी ग्रँटची आज्ञा आहे.[२२]

ग्रँटशीं कांहीं बाबतींत झालेलीं प्रश्नोत्तरें नोंदविलीं जात. उदाहरणार्थ ग्रँटनें विचारलें, "फिर्यादी कमी आहेत कीं नाहीं" "कमी आहेत उत्तर केलें" "काम कसे चालते पुसले." "दस्तूरमाफक चालते सांगितले." "पंचाइत प्रकर्णी यादी तयार आहेत की नाहीत," "आहेत म्हणून सांगितले."[२३]

विठोबा दिवाणानें काय कामें करावीं याची एक मोठी यादी-२० कलमांची दिली आहे. हींत घाटावर चौकी बसविणें, रयतेला त्रास देणाऱ्या रामोशांना शासन करणें, तोफखान्याकडील अधिकारी किती ठेवावेत, घाटावर ठेवावयाचे कारकून, कचेरीच्या वाड्यावरील पहारेकरी कोणत्या बाजूस किती ठेवावेत आणि दर पाहऱ्यांत किती शिपाई असावेत, कंपनी सरकारच्या बागेंतील भिस्ती, नोकर यांच्या नेमणुका, दिवाण, चिटणीस, फडणीस याकडे प्रत्येकी किती शिपाई असावेत, त्यांची बदली केव्हां करावी, शिबंदीची तैनात इत्यादि विविध विषयांवर आज्ञा दिल्या आहेत.[२४]

साताऱ्याच्या राज्यांत त्यानें कांहीं नवीन प्रथा सुरू करण्याचा उपक्रम केला होता. महाडीक, थोरात इत्यादि वतनदारांना त्यानें खानेसुमारीबावत खलिते पाठविले आहेत. "हर येक तालुक्यातील घरे व माणसे व गुरे वगैरे किती आहेत याचा झाडा घ्यावयाचा दस्तूर कुपणी सरकारात आहे याकरितां नमुन्याप्रमाणे श्रीमन्माहाराज छत्रपति साहेब यांचे इलाख्यांतील झाडा तयार करून पाठविण्याविसीं लिहिले........ तरी नमुना आधी समजुन घेऊन वीस दिवसांत झाडे तयार करून देवावे."[२५]

---

२० अ. डेक्कन कॉलेज रु. ५५ फा १२ : २८ ता. ७-९-६७ २१. डेक्कन कॉलेज रु. ५५ फा १२ : १३. २२. डेक्कन कॉलेज रु. ५५ फा १२ : १४. २३. डेक्कन कॉलेज रु. ५५ फा १२ : २९. २४. डेक्कन कॉलेज रु. ५५ फा १२ : २५. डेक्कन कॉलेज रु. ५५ फा १२ : ४,१९.

पेशवे दप्तरांत ग्रँट साहेबाच्या कारकिर्दीतील जीं पुडकीं आहेत त्यांत पेठ्यांकडून जमा होणारा वसूल, निरनिराळ्या कारखान्यांच्या कामावर कोणकोणते लोक नेमले त्यांतील सुतार, गवंडी इत्यादि कारागिरांच्या कामाचीं हजेरीपत्रकें, त्यांचे पगार इत्यादि याद्या आहेत. पेठ्यांतून आलेल्या रकमेची पावती इंग्रजी–मराठी भाषांतून आहे. या पावतींत साल गुदस्त आणि साल मजकूर असे दोन भाग असून त्यांचे तपशील दिले आहेत. तसेंच किती प्रकारचे रुपये किती आहेत–मलकोरे, चांदवड, छापी चांदवड, मध्यम छापी, फुटके चांदवड आणि खुर्दा किती याचा तपशील आणि शेवटीं खजांची आणि सराफ यांच्या सह्या आहेत. ही पावती पाहिल्यावर, पैसे भरल्याची आज बँकेतून जी पावती मिळते तिची आठवण होते.

या खेरीज ३१४ मोठी बारनिशी बुकें असून त्यांत सरकारांतून गेलेल्या पत्रांची नोंद आहे. उदाहरणार्थ बाजीरावाच्या एका सैनिकाला येथें समज दिली आहे कीं, धन्याचा पराभव झाला तरी तू अद्याप कंपनी सरकारांत कां रुजूं झाला नाहींस इ०

चार वर्षें सातार्‍याचा राज्यशकट हाकल्यानंतर ग्रँटनें निरवानिरव करण्यास प्रारंभ केला. राजाच्या कारभारावर त्याचें बारीक लक्ष होतें. त्याच्याकडे सर्व सत्ता देण्यास हरकत नाहीं अशी त्याची खात्री झाली. प्रस्तुत संदर्भात प्रतापसिंहाशीं त्याची झालेली चर्चा विस्तृतपणें रोजनिशी क्रमांक ४१५ मध्यें आली आहे.

ग्रँट गेल्यानंतर आपलें कसें होईल याची चिंता राजास वाटूं लागली. ग्रँटनें त्याची समजूत घातली कीं आम्ही लिहून ठेऊं "जो वकिलीस सातारा येथे साहेब लोक येईल त्यास साहा महिने वहिवाट पाहून आमी समजून देऊन मग जाऊ व पुढे वहिवाट राहील त्याणे तसी करणे.[२६]

राज्य हवालीं कसें करावें याचा मसुदा त्यानें राजाकडून करून घेतला व तो कमिशनर च्यापलिनकडे पाठविला. जहागीरदारांच्या बाबतींत राजानें घातलेलें कलम कंपनीनें मान्य केलें नाहीं. तथापि दि. ५ एप्रिल १८२२ रोजीं सातारच्या रंगमहालांत कचेरी होऊन च्यापलिन, ग्रँट, मॅकलोड, मॉरिस इत्यादि अधिकार्‍यांच्या उपस्थितींत बाळाजीपंत नातूनें "राज्य माहाराजाचे हवाली केल्याचा जाहीरनामा वाचिला नंतर सिकेदऊत व मोर्तब ग्राट साहेबानी आपले हाती उठोन महाराजांचे हातो दिल्ही." आणि नंतर सर्वांना यादीप्रमाणें पोशाख वाटून सत्तांतराची क्रिया पूर्ण झाली.[२७]

दि. २७ नोव्हेंबर १८२२ रोजीं ग्रँटनें महाराजांचा निरोप घेतला आणि उपदेशाचे चार शब्द सांगितले, "येथे कोणी येईल त्यावर भरवसा ठेवावा म्हाराजांनी व जे म्हाराज करणे ते साफ बोलावे व येक बोलून येक तरेने न करावे." इत्यादि.[२८]

---

२६. रो. क्र. ५ पृ. १३४. २७. डेक्कन कॉलेज रु. ५५ फा. १२ : १४. २८. रो. क्र. ६ पृ. २११.

ग्रँटला कांहीं चीज याददास्तीकरितां द्यावी असें महाराजांच्या मनांत फार होतें. त्यांनीं एक तरवार देऊं केली असतां, साहेब लोकाचा दस्तूर कांहीं घेण्याचा नाहीं असें सांगून त्यानें त्याचा इन्कार केला.[२९]

## इतिहासलेखन

एल्फिन्स्टनच्या प्रेरणेनें इतिहासलेखनाचें कार्य ग्रँटनें हातीं घेतलें. पेशवे दप्तर खंड ४२ मधील उतारे इतिहासाची जुळवाजुळव करण्याचे कामीं ग्रँटनें केलेल्या परिश्रमाची ग्वाही देतात. डेक्कन कॉलेजांतील सातारा दप्तरामध्यें एक अपुरा जाहीरनामा आहे. त्यावर तारीख नाहीं. कागद नकल असल्यामुळें त्याची अस्सल पुराव्यांत गणना करतां येत नसली, तरी त्यांत आलेल्या मजकुरावरून आणि ग्रँटनें नंतर केलेल्या कामगिरीवरून असें वाटतें कीं, हा जाहीरनामा ग्रँटनेंच काढला असावा. तो असा—
" जाहीरनामा माहाराज मंडळ हुजुरून समस्त लोकास समजावे याकरिता आज्ञा केली जाती जे बखर व कैफियत व ताम्रपत्रे व जुने सनदा वतनपत्रे व इनामपत्रे वगैरे व मुलकाचे हकीकतीसुद्धा मराठे अक्षराची व पारसी व बालबद्ध व संस्कृत व हिंदुस्थान्यातील व जुने हिंदी राज्यातील व बदर पादशाही व निज्यामशाही व इदलशाही राज्यातील व सिवाजी माहराजाचे राज्याचे कारकिर्दीतील व संभाजी महाराज व राजा ...... "[३०] इतक्या स्पष्ट आज्ञा ग्रँटशिवाय दुसरा कोण देणार ?

इतिहासाकडे पहाण्याची ग्रँट डफची दृष्टी शास्त्रशुद्ध होती असें अनुमान पेशवे दप्तर ४२ व्या खंडांत प्रतापसिंहाच्या डायरींतील जे उतारे प्रसिद्ध झाले आहेत तसेच जे अद्याप अप्रकाशित आहेत त्यांवरून काढावयास प्रत्यवाय नसावा. ग्रँट डफच्या इतिहासांत दोष राहिले असतील तर ते प्रमाणभूत साधनांच्या अभावामुळेंच होय असें म्हणावें लागेल. प्रतिनिधिपद केव्हां सुरू झालें ? मोकासा, चौथाई व सावोत्रा, जाहगीर इत्यादि वाटणीचे प्रकार कसे आहेत ? अष्टप्रधानांचें वेतन काय ? तें नख्त कीं सरंजाम होतें ? स्वराज्य म्हणजे काय ? सरदेशमुखी अमल जुना कीं नवा ? इत्यादि अनेक प्रश्न ग्रँट बळवंतराव चिटणीसांना पुसत असे व त्यांनीं उत्तर दिलें म्हणजे " दाखला " दाखवा असें म्हणे. आवा पारसनिसाकडून पारसी कागदाच्या नकला करून घेई. सरदेशमुखी, बाबती, चौथाई यांचा दस्तूर सर्वत्र सारखा नसल्यामुळें आणि फडणीस अथवा चिटणीस यांनीं दिलेलीं स्पष्टीकरणें समाधानकारक नसल्यामुळें " फार फिकीर आहे, कोणी पुरा माहीत बुढा आहे की नाहीं शहरांत " अशी ग्रँट पृच्छा करतो. यावर " अमल का बुढा " मिळाला नाहीं तर त्याचा काय उपयोग म्हणून पारसनीस चालढकल करूं पाहतो.

चिटणीस, ग्रँट डफ आणि बाळाजीपंत नातू यांच्यामध्यें सरदेशमुखीबाबत झालेली चर्चा उद्बोधक आहे. ग्रँटनें विचारलें " सरदेसमुखी अमल जुना की नवा ? " यावर-चिटणीसांनीं सांगितलें कीं, " जुना शिवाजी माहाराजापासून आहे. " ग्रँट डफची विचार-

---

२९. डेक्कन कॉलेज रु. ५५ फा. १२ : ११. ३०. डेक्कन कॉलेज रु. १ फा. ६ : २४.

पद्धति बाळाजीपंतानें जणूं आत्मसात केली होती. तो चिटणीसास विचारतो, " यास आधार काय ? " त्यावर जुनी याद आणि फर्मान पाहून चिटणीसांनीं वाचून दाखविलें, " सरदेसमुखी, चौथाई **साधले** त्याचें फर्मान करून आणावें. "

यावर बाळाजीपंतानें चटकन् चिटणीसाला दुरुस्त केलें, " **साधेल** म्हणा **साधले** असें म्हणूं नका. मात्रा **ध** वर या **ल** वर देऊं नका. "[31]

कागदपत्र मिळविणें, त्यांच्या नकला करवून घेणें, बखरीचें इंग्रजी भाषांतर करवून घेणें या बाबतींत ग्रँटनें जे अविश्रांत परिश्रम केले आहेत त्यावरून आपला इतिहास पक्का करण्याचा त्याला कसा ध्यास लागला होता याची कल्पना येईल. रायगडाच्या वेढ्यांत ( इ. १६८९ ) सगळे जुने कागद पादशहानें हस्तगत केले या चिटणीसाच्या उत्तरानें त्याचें समाधान झालें नाहीं. किती तरी प्रश्नांचा त्याला नीट उलगडा झाला नव्हता. शाहू महाराज दिल्लीहून कधीं आले ? बाळाजीपंत पेशवे सनदा आणण्यासाठीं दिल्लीस एकटेच गेले कीं त्यांजबरोबर आणखी कांहीं सरदार होते ? बाळाजी विश्वनाथ आंग्रे याजवर मुलूख घेण्यास चालून गेले तेव्हां प्रतिनिधी कोण होते ? प्रतिनिधीपद वरिष्ठ असेल तर ते कां गेले नाहींत ? चंदरराव मोरे याचे बापाचें नांव काय ? शाहूच्या कुत्र्यानें कोणत्या रानांत आणि केव्हां वाघ मारला म्हणून त्याला पालखीची नेमणूक करून दिल्ही.[32] इत्यादि एक ना दोन, अनेक प्रश्न ग्रँटला सतावीत होते आणि त्यांची उत्तरें शोधून काढण्याचा त्यानें कसोशीनें प्रयत्न चालविला होता.

इतिहासाचीं साधनें कोणतीं अव्वल दर्जाचीं व कोणतीं कमी प्रतीचीं याची त्याला पूर्ण जाणीव होती. बखर हें एक इतिहासाचें साधन असलें तरी संपूर्णतया त्यावर विसंबून राहून इतिहास लिहितां येणार नाहीं हें तो जाणत होता. चिटणीसाला तो म्हणतो, " बखर केली परंतु सारी माहाराजाची बढती. चांगलेच लिहिले. येखादे वेलेस वाईट चालले आसते तरी लिहिले नाहीं तेव्हा संषय येतो. सारेच चांगले असते असें नाहीं." असें असलें तरी फारसी तवारिखापेक्षां मराठी बखरी त्याला जास्त प्रमाणभूत वाटतात. "मुसलमान लोकांनी तारीफ करून किताब लिहिली ती लबाड फार. हिंदूचे लिहिणे निम्मे खरें व निम्मे खोटे याप्रमाणें आहे. " असें म्हणून त्यानें नारायणराव नांवाच्या माणसास बखरीचें इंग्रजी भाषांतर करण्यास नेमलें होतें व बळवंतराव पारसनीसाला विचारून जुनीं टांचणें पाहून भाषांतर करावे[33] अशी त्याला आज्ञा दिली होती.

कागदपत्र हेंच इतिहासाचें खरें प्रमाणभूत साधन होय हें तो जाणून होता आणि म्हणूनच बाळाजीपंताकडे त्याचा सारखा लकडा सुरू होता कीं, महाराजाकडून कागद पत्र मिळवा. कागदपत्राचे बस्ते देण्यास महाराज नाखूष होते. फडणीसानें जेव्हां सांगितलें कीं, पारसनीस आपल्या घरीं अथवा वाडियात बसून, मुनसीला बरोबर

---

३१. पे. द. ४२ पृ. १८ – १९. ३२. पे. द. ४२ पृ. २८. ३३. पे. द. ४२ पृ. २७–३१

घेऊन साऱ्या कागदांच्या नकला करून देतील तेव्हां त्याला मनस्वी राग आला. तो म्हणतो, "इतका संशय का ? पाहिजे तरी आम्ही हर बस्त्यावर मोहर करू अथवा तुम्ही करा, इ० " ग्रँटनें असा रुद्रावतार धारण केल्यामुळें त्याच्याकडे गुंतलेले कागद परत कसे आणावयाचे याची साऱ्यांना चिंता होती. आबा पारसनीसच लिहितां लिहितां युक्ती प्रयुक्तीनें कांहीं कागद आणतील तर बरें असें साऱ्यांना वाटूं लागलें. मिळालेल्या बस्त्यानें ग्रँटचें समाधान झालें नव्हतें.

बाळाजीपंत नातूस तो सांगतो कीं, महाराजापाशीं अथवा चिटणीसापाशीं आणखी कांहीं कागद असतील असा संशय येतो, त्याचा पुर्ता शोध फडणीसाकडे करावा. या-संबंधीं विचारलें असतां फडणीस कानावर हात ठेवतो. तदनंतर "माहाराज, फडणीस, चिटणीस आणि बाळाजीपंत बसून तावदानाचे खोलीत बोलणे झाले." प्रारंभीं पावसा-पाण्याच्या गोष्टी झाल्यानंतर खलबतें झाली आणि महाराजांनीं निक्षून सांगितले, "ग्रँटविषयी आमच्या मनांत कांहीं संशय नाहीं. दोस्ती झाली तेथें संशय कसला ? जे होते ते सारे दिले. यापरते नाही." बाळाजीपंतानें चिटणीसाला दमदाटी करून पाहिलें, "आणखी एखादे समई निघालियास नीट नव्हे ?" महाराजांचीं आर्जवें केलीं, आमिषें दाखविलीं. "सारे कागद पाहून छाप्यात छापून विलायतेस जाईल. सर्वांस महाराजाचा पराक्रम राज्ये वगैरे जाहीर होईल याकरिता करितात." तरी पण प्रतापसिंहानें आपलें म्हणणें सोडलें नाहीं.[३४]

महाराजांनीं आपल्या सर्व अधिकाऱ्यांना ताकीद दिली होती कीं "कागद ग्रांटास दाखवून, न ठेवतां माघारे आणावे आणि न्याहाल त्याची यादी लेहून सेरा मारून घेऊन जाणे."[३५] चिटणीसांनीं पुरविलेल्या माहितीचा आपण संपादन केलेल्या माहितीशीं मेळ बसत नव्हता, म्हणून चिटणीसास तो सतत प्रश्न विचारूं लागला. प्रताप-सिंहानें चिटणीसास सांगितलें, "जे पुसतील माहितगारी ते बखर दिल्ही या आधारावरच धरून बोलावे. जे पूर्वींपासून माहीत आहे ते असे आहे. मग तुमचे लिहिले असेल ते खरे म्हणावे. आग्रह करू नये. जबरदस्तापुढें आग्रह करून कामाचा नाही व आग्रह, सिध्ध करून फल होते असे नाही. होणार ते होईल व कागद आणखी आहे, पुसतील तरी नाही म्हणावे. हे दोन जाबसालानी उतरे करावी. रिकामा विच्यार विवंचना घोर करून लभ्ये नाही. समयेपरत्वे होय म्हणत असावे."

ग्रँटच्या इतिहासाच्या कामांत बाळाजीपंत नातूची त्याला बरीच मदत झाली असावी. बाळाजीपंतानें आपणांस ऐतिहासिक माहिती लिहून दिली व तिचे इंग्रजी भाषांतर आपण करवून घेतलें असें ग्रँटनें आपल्या इतिहासांत नमूद केलें आहे[३६]. त्याचा बराच उपयोग त्यानें करून घेतला असला पाहिजे. बाळाजीपंतास "बखर पावली

---

३४. पे. द. ४२ पृ. २३-२६ ३५. पे. द. ४२ पृ. ३०. ३६. History of the Marathas by Grant Duff (1921) Vol. II Foot note p. 470.

बहुत मेहरबानगी झाली पाहून परत पाठवू " अशा आशयाचें पत्र पाठविण्यासंबंधीं त्यानें चिटणीसांना सांगितलें होतें.[३७] ही बखर म्हणजेच बाळाजीपंतानें तयार केलेला मराठ्यांचा इतिहास असावा.

इतिहासलेखनाच्या कामीं एलफिन्स्टननें त्याला केवळ प्रेरणाच दिली नाहीं तर आवश्यक तें सहाय्य केलें. दि. २१ मार्च १८२२ रोजीं ग्रँटला लिहिलेल्या एका पत्रांत तो म्हणतो, " तूं पाठविलेलीं तीन प्रकरणें मी अपेक्षेपेक्षां जलद वाचून संपविलीं. तीं वाचून मन प्रसन्न झालें. इतिहासलेखनाच्या तुझ्या शैलींत पूर्वीपेक्षां खूपच सुधारणा झाली आहे. संथ आणि प्रौढ अशी लेखनशैली तू संपादन केली आहेस. पूर्वी तुझ्या शैलींतील जे दोष मी दाखविले होते ते आतां नाममात्रही राहिले नाहींत."[३८] त्यानंतर १ महिन्यानें म्हणजे दि. २०।४।१८२२ ला पाठविलेल्या पत्रासोबत एलफिन्स्टननें आपली राजारामासंबंधींचीं टिपणें आणि इतिहासलेखनासंबंधीं कांहीं सूचना पाठविल्या " असंख्य अशा असंबद्ध बखरी आणि फुशारकी मारणाऱ्या तवारिखा यांच्यामधून घटनांचें संपादन करून त्यांची चातुर्यानें मांडणी करून त्यांतून एक सुसंगत आणि सयुक्तिक ( Rational ) असा इतिहास निर्माण करणें, हें काम कठीण आहे आणि तें तूंच एकटा करूं शकशील असा मला भरवसा आहे. प्रसंगीं तुला कल्पनेचा आधार घ्यावा लागेल. तेव्हां आपल्या मनांतील शंका व्यक्त करण्यासाठीं, ' बहुधा ' ( probably ) " वर-करणी " ( apparently ) अथवा अशा आशयाचे शब्दप्रयोग तुला वापरावे लागतील; अर्थात् या वाक्प्रयोगांचा तू अतिरेक करतां कामा नये. जे उघड आहे, सूर्य प्रकाशा-इतकें स्पष्ट आहे तें सांगू नये. या दोन्हींचा मध्य साधणें यांतच इतिहासकाराचें कौशल्य आहे. "[३९]

दुसऱ्या एका पत्रांत ( दि. २७।४।१८२२ ) पुणें, हैद्राबाद आणि कलकत्ता येथील दप्तरांत मराठी इतिहासाला उपयुक्त अशी कोणती साधनसामग्री सांपडेल याची एक मोठी यादी एलफिन्स्टननें त्याला दिली होती असा उल्लेख आहे.[४०]

थोडक्यांत, साताऱ्याचा रेसिडेंट म्हणून काम करीत असतांनाच मराठ्यांच्या इतिहासाच्या सामग्रीचें संपादन व जुळवणी आणि कांहीं कच्चें लेखन ग्रँटनें केलें असलें पाहिजे असें म्हणावयास हरकत नाहीं. इ. १८२२ च्या अखेरीस त्यानें आपलें घर गांठलें आणि मराठ्यांच्या इतिहासाला सर्वस्वी वाहून घेतलें. इतिहासलेखनाचें काम हातावेगळें केल्यानंतरच म्हणजे इ. १८२७ सालीं वयाच्या ३८ व्या वर्षी त्यानें लग्न केलें. एलफिन्स्टनला ग्रँटच्या कामाबद्दल इतका आत्मविश्वास वाटत होता कीं, इ. १८२२ सालीं कर्नल क्रोजला लिहिलेल्या पत्रांत तो म्हणतो, " त्याचा ग्रंथ अत्युत्तम ठरेल. "[४१]

---

३७. डेक्कन कॉलेज रु. ५५ फा. १२ : २९ दिनांक ८–९–१८२२. ३८. Colebrooke Vol. II p. 157. ३९. Ibid p. 137–38. ४०. Ibid p. 137–38. ४१. Ibid p. 140.

इ. १८२६ सालीं ज्या ग्रंथाला प्रकाशक मिळत नव्हता, त्या ग्रंथाच्या पुढें सहा आवृत्त्या निघाल्या आणि मराठ्यांच्या इतिहासकारांत ग्रँटला महत्पद प्राप्त झालें.

ग्रँट डफच्या एकंदर कारकिर्दीचा विचार केला असतां असें वाटतें कीं, २९ वर्षांचा हा तरुण अधिकारी शासनांत चांगलाच वाकबगार होता आणि आपल्या व्यक्तिमत्त्वाचा ठसा इतरांवर उमटविण्याची कला त्याला चांगली साध्य झाली होती. सरदेसाई म्हणतात त्याप्रमाणें तो एक सामान्य ब्रिटिश लष्करी शिपाई[४२] ( a raw British soldier ) निश्चित नव्हता. सातारच्या राजाचा आणि जनतेचा त्यानें चांगलाच विश्वास संपादन केला होता. ग्रँट साहेबाचें नांव आजहि सातारा जिल्ह्यांतील लोकांच्या तोंडीं आहे ( a household name )[४३] असें जें पारसनिसांनीं म्हटलें आहे तें वस्तुस्थितिनिदर्शक आहे असें म्हणावें लागेल. एक कुशल प्रशासक आणि जाणता इतिहासकार म्हणून ग्रँटनें मानाचें स्थान पटकाविलें आहे.

---

# ११ निवृत्तिनाथांचीं स्फुट प्रकरणें व ग्रंथ

( श्री. ज. शा. देशपांडे, मुंबई )

महाराष्ट्रांतल्या अलौकिक विभूतींमध्यें निवृत्तिनाथ, ज्ञानेश्वर, सोपानदेव व मुक्ताबाई या चार भावंडांची गणना प्रामुख्यानें होते. त्यांचे मानले जाणारे अभंग मिळतात, पण त्यांची भाषा अर्वाचीन असून, निश्चित पाठ नाहींत व अनेकांनीं अभंग तयार करून त्यांत घुसडलेले दिसतात. यामुळें या चौघांचे खरे अभंग असल्यास ते कोणते, हें ठरविणें कठीण झालें आहे. ज्ञानेश्वरांचे यादवकालीन भाषेंत ज्ञानेश्वरी व अमृतानुभव हे ग्रंथ उपलब्ध आहेत. ज्ञानेश्वरींत जागोजागीं निवृत्तिनाथांचा आदरपूर्वक उल्लेख येतो. ज्ञानेश्वरांना गुरुस्थानीं असणारी व्यक्ति सामान्य असणें अशक्य आहे. निवृत्तिनाथांनीं ग्रंथरचना केली होती कां, अशी शंका सहज येते. याबद्दल शोध करतांना निरनिराळ्या हस्तलिखितांबद्दल मिळालेली माहिती खाली दिली आहे.

**निवृत्तिप्रसादः**—धुळें येथें श्रीसमर्थवाग्देवता मंदिरांत बाडांक १२८३ मध्यें पृष्ठ ३१, ३२ वर १० संस्कृत श्लोक मराठी श्लोकानुवादासह आहेत. त्यांची सुरवात अशी आहेः—

निवृत्तिप्रसाद ४३ ॥ अ ॥

---

४२. New History of the Marathas by G. S. Sardesai, Vol. II p. 510. ४३. भारतवर्ष अं. १७१८.

श्लोक--रक्तपीतश्च श्वेतश्च। श्वेतसमश्च कर्बुरं। रक्तश्याम तथा नीलं। कृष्णयुक्तं सुनीलजं ॥

टीका--रक्त आणि पीत। हा वर्ण एकांगभूत। तो अकार रजोगुणयुक्त। स्थूल देह हा ॥ १० ॥

४३ अध्यायांपेक्षा अधिक अध्यायांचा हा ग्रंथ असावा. श्लोकांची भाषा अर्वाचीन असल्यानें हा ज्ञानेश्वरबंधु निवृत्तिनाथ यांचा ग्रंथ नाहीं हें उघड दिसतें.

**निवृत्ति अवधूतकृत परमप्रकाश अथवा ज्ञानबोधः--**

वरील संस्थेंत बाडांक २५८ मध्यें परमप्रकाश हें ८५ ओव्यांचें प्रकरण आढळतें. ते इ. १८९४ (मे व जून) मध्यें काव्यसंग्रहांत प्रकाशित झालें. "यावरी गुरुने सीश आळंगिला। सीश आनंदें बोधला। ते ज्ञान अनुवादला। निवृत्ति अवधूत ॥ ८४ ॥ सद्गुरुकृपाप्रसादें। वाचा प्रकाश आनंदें। ते सुख अनुवादे। निवृत्ति अवधूत ॥ ८५ ॥" असा त्याचा शेवट होतो. हेंच प्रकरण बाडांक ४२० मध्यें थोड्या फरकानें 'ज्ञानबोध' या नांवानें आढळतें. "श्रीगुरुआनंदचैतन्यप्रसादें। वाचा प्रकाशिली स्वानंदें। म्हणोनि मी आत्मसुखें अनुवादे। परात्पर अनुपम्य जें ॥ ८३ ॥" असा त्याचा शेवट आहे. हे निवृत्ति अवधूत निवृत्तिनाथ नव्हेत, यांत शंका नाहीं.

**पंचपदी प्रकरण व अन्य ओव्याः--**

'पंचपदी' हें छोटें प्रकरण व इतर कांहीं स्फुट ओव्या पुणें येथील भारत इतिहास संशोधक मंडळाच्या बाडांत आढळल्या. त्यांची भाषा अर्वाचीन आहे.

**निवृत्तेश्वरी, निवृत्तिदेवी इत्यादि नांवांच्या गीताटीका :—**ह्या निवृत्तिनाथांच्या नांवानें आढळल्या. या ग्रंथांचें परीक्षण करतांना विचित्र स्थिति आढळते. हे निरनिराळे एकाच कविनामाचे ग्रंथ पूर्ण भिन्न असून एकाचें दुसऱ्याशीं साम्य नाहीं. त्यांची माहिती खालीं दिली आहे :—

(१) **निवृत्तिटीका—** भारत इतिहास संशोधक मंडळ बाड २२।१०१ या पोथीला १, २९ व ३२, ४२ पानें नाहींत. ग्रंथ ११३९ ओव्यांचा होता. शक १५८३ हा नकलेचा काल असावा. भाषा यादवकालीन नाहीं, तरी जुनी आहे. ओव्या बहुतेक साडेतीन चरणी आहेत. पान ४३ वरील व शेवटच्या कांहीं ओव्या नमुन्यादाखल दिल्या आहेत.

**पान ४३—** मन बुधी ठेउनीया माझा ठाई। परस्परे प्रतिबोधा पैं। गुणकीर्तनी संतोसोनी देही। रमत मजसी ॥ ५१ ॥ ते मजसी सतत युक्त। प्रीतिपूर्वक मातें भजत। तयासी मी बुधीयोंमृते देत। जेणें पावति मातें ॥ ५२ ॥ तैसीया कृपा करुनी। अग्यानतमातें नाशुनी। तयाचीया ग्यानादीपातें प्रकासौनी। दें गा अर्जुना ॥ ५३ ॥ तंव अर्जुनु म्हणे जी परब्रम्हा। आगा पवित्रा परमाध्यामा। सकळासी परुतू पुरुशोत्तमा। दीव्य-

स्वरूपा ॥ ५४ ॥ तुं शाश्वतु स्वयंतु । जन्मविरहितु अमरकंदु । तु समस्तांचा रावो प्रभु । आदिवंतु तुंची ॥ ५५ ॥ तुवां यैसे बोलीले । जे हे सकळै मजपासुनी जाले । देवऋशी नारदादी जीतुले । मुक्त करुनी ॥ ५६ ॥ हे सकळै देख । मजपासुनी असेष । यैसें सांगितले व्यापक । देवराया ॥ ५७ ॥

**शेवट**— तुझें वचन मज । कारण असे नीज । दासु मी अनुसरुलु तुज । सर्वभावें ॥ ३५ ॥ यैसे संजय बोलीले । जें देवें अर्जुनाप्रति निरोपिलें । आइकोनि मन कां ढळलें । सर्वांगीं देखा ॥ ३६ ॥ व्यासांचेनि प्रसादें । जे परम गुज सांगितलें गोविंदें । यौगेस्वरें परमानंदें । साक्षात आपन ॥ ३७ ॥ राया कासीया सांगो मागुती । या संवादाची अद्भुत गती । श्रीकेशवे अर्जुनाप्रती । निरोपिले जें ॥ ३८ ॥ येया संवादाचा हरीषु । वेळोवेळा येतुसे अधीकु । सांगता जाला वीश्वव्यापकु । अर्जुनाप्रती ॥ ३९ ॥ इति श्रीभगवद्गीता । श्रीकृष्णरावो नीरोपिता । शुभाशुभकर्मवेवस्ता । अठराध्याईं ॥ छ ॥ इति श्रीनिवृ ( ति ) टीका ग्रंथ संपूर्ण ॥ शुभं भवतु ॥ ग्रंथसंख्या वोवीया तौ ॥ ११३९ यादृशं पुस्तकं अिसंवत् १७१८ शक ११८३ प्लवनाम संवस्तरे उत्तरायणे वसंतऋतौ महामांगल्यप्रदे फाल्गुनमासे कृष्णपक्षे तिथी २ सोमे नानथा ग्रामे ग्रंथ समाप्त जाला ॥छ॥

**( २ ) निवृत्तिदेवकृत भगवद्गीताटीका**—धुळें येथील श्रीसमर्थवाग्देवता-मंदिरांत बाडांक ३५० मध्यें या टीकेचे १ ते ८ अध्याय असून बाडांक २१९७ मध्यें सर्व अध्याय आहेत. प्रथम अध्याय ' रामदास व रामदासीं ' वर्ष ३५ मध्यें अलीकडेच प्रकाशित झाला. टीकेचा आरंभ " पहिला नमु ईश्वरु । जो गिरिजेचा मनोहरु । तो परमपदाचा दातारु । शूलपाणी ॥ " या ओवीनें होत असून, " आतां श्रीमत भगवद्गीतेचा अभिप्रावो । मऱ्हाटीया करीन प्रस्तावो । विनवीतसे निवृत्तिदेवो । यथामति त्या ॥ ( ३० ) या ओवींत निवृत्तिदेवांचें नांव येतें. बाडांक ३५० मधील अक्षरांचें वळण जुनाट आहे. अध्याय ८ मधील कांहीं ओव्या ( संस्कृत श्लोक उद्धृत केले नाहींत ) पहा. :--

" शुक्लपक्षी होये गती । नाहीं त्यास पुनरावृती । कृष्णपक्षी अवगती । पुनरावृती होये ॥ ५२ ॥ यैसी शुक्लकृष्णगती । जगत्रई शाश्वत मती । आगा हे नेणतीच नीरुती । श्रुतीमतें पै ते ॥ ५३ ॥ म्हणोनि तो श्रुतीमतान्येनि पार्था । योगीया मोहाते न पवे सर्वथा । त्याकारणे सर्वकाळी योगयुक्ता । तूं होये अर्जुना गा ॥ ५४ ॥ वेदयज्ञ दान आणि ते पुण्ये । करितील फलभोगरुपें । तैसीया प्राण्याचेनि दीपे । योगी दीपेना तो ॥ ५५ ॥ सकळै सांडुनी कामना । तुवा भआवेआ लागेल अर्जुना । तो योगी पावे परम स्थाना । तेची आम्ही गा ॥ ५६ ॥

**ग्रंथाचा शेवट**— योगासि स्वामीचा स्वामी म्हणवितु । तो श्रीकृष्णनाथ जेथे आसतु । तेथे धनुर्धर असे पार्थु । तिष्ठत उभा ॥ १६१ ॥ तेथें असे श्री लक्ष्मी विजय । यश निति परमैश्वर्य । हें माझें मत विशेषाकार । एक धृतराष्ट्रा ॥ १६२ ॥ हरिॐ अि

इति श्रीमद्भगवद्गीता । श्रीकृष्णदेवो निरोपिता । समस्त गीता विवर्णता । अष्टादशाध्याई ॥ शके १७३२ प्रवर्तमाने प्रमादनाम संवत्सरे भाद्रपदकृष्णत्रयोदश्यां बुधवासरे तद्दिने भुजंगरावस्यात्मजः सखारामेण लिखितम् ॥

शक १७३२ हा नकलेचा काळ दिसतो. ग्रंथांतील ओव्या बहुतेक साडेतीन चरणी असून जुने शब्द मधून मधून येतात. तथापि भाषा यादवकालीन नाहीं.

पोर्तुगालमध्यें ब्राग येथील ग्रंथसंग्रहालयांत ७७३ क्रमाकांच्या बाडांत असलेली निवृत्तेश्वरी धुळेंप्रतीशी जुळते. यादवकालीन नाही.

## ( ३ ) तंजावर येथील सरस्वतीमहाल मंदिरांतली 'निवृत्तिदेवी' समश्लोकी पोथीचा प्रारंभ...

धर्मक्षेत्री कुरुक्षेत्री मिळोनी । युद्धवांछा धरूनि मनी । माझे ( पुत्र ) आणि पांडव जुडोनी । काय करिताति संजया ॥ १ ॥ देखोनि पांडवसैन्य सुरचित । आचार्याप्रति जाउनि त्वरित । राजा दुर्योधनु यथोचित । बोलता जाला ॥ २ ॥ राजा म्हणे पाहे पां । आचार्याइते सुरचित । पांडवसेनेते द्रुपदपुत्रे । श्रीमंतें तुझियेनि शिष्यें ॥ ३ ॥ अती शूर महाथोर । भीमार्जुनसम वीर । युयुधान विराट युद्धचतुर । द्रुपदु महारथी ॥ ४ ॥ धृष्टकेतुश्चेकितान । कासिराजा वीर्यवंतु जाण । पुरुजित कौतिभोज आपण । शैब्यु नरश्रेष्ठ ॥ ५ ॥ युधामन्यु आणि विक्रांत । उत्तमौजा बळिवंत । सौभद्र द्रुपदपुत्र । आद्यंत सर्वही महारथी ॥ ६ ॥ आमचे विशिष्ट आइके द्विजोत्तमा । नायक सैन्याचि महिमा । ते संज्ञार्थें करूनि तुम्हा । सांगेन देखा ॥ ७ ॥ तुं आणि भीष्म कर्ण कृपाचार्या । अश्वत्थामा विकर्ण गा आचार्या । सोमदंती महावीर्या । मध्ये श्रेष्ठ ॥ ८ ॥ आणि माहाशूर बहूत । मज्रकारणे त्यक्तजीवित । नानाशस्त्रें सोडू जाणत । युद्धी कुशल जे ॥ ९ ॥ आमचे भीष्म सैन्य रक्षील नेमें । पांडवसैन्य रक्षिलें भीमें । म्हणोनि ते अधिकाक्रमे । श्रीकृष्णाश्रये ॥ १० ॥

**शेवट**--हा तुझा माझा संवादु । याचा करिता अनुवादु । त्यानें ज्ञान होये सच्चिदानंदु । योजिले होये ॥ ७० ॥ अनुसोई आणि श्रद्धापरु । याचे श्रवण करी जो नरु । तो मुक्तु आणि सदाचारु । गतिते पावे ॥ ७१ ॥ हा उपदेशु तुवां आइकिला । येकाग्रे मनी धरिला । तरि तुझा मोहो असका नासला । हृदयातिला ॥ ७२ ॥ अर्जुना म्हणे गोपाळा । स्मृति जालि मोहो नासला । अच्युता माझा संशयो गेला । तुझा बोल करीन मी ॥ ७३ ॥ संजयो धृतराष्ट्राते बोले । देवें अर्जुनासि निरोपिलें । यैकोनिया हर्षे कांटाळले । सर्वांग तयाचे ॥ ७४ ॥ व्यासप्रसादें आइकिलें । जे का परमगुह्य बोलिलें । योगेश्वरें कृष्णे तलें । आपण स्वयें ॥ ७५ ॥ राया काय सांगो मागुति । मागुति या संवादाची स्थिति । कृष्णार्जुन पुण्यमूर्ति । याचा अंश अंश हरुष वाटतो ॥ ७६ ॥ ते स्मरे पुडती पुडती । त्या विश्वरुपाची स्थिती । विस्मयो राजयाप्रति । संतोशे पुनः पुनः बोले

। ७७ ।। जेथें श्रीकृष्ण योगेश्वरु । जेथ पार्थ धनोर्धरु । तेथें लक्ष्मी वसे निरंतरु । आणि तेथेचि जयो निश्चयेसि मति माझी ।। ७८ ।।

या पोथींतल्या बहुतेक ओव्या चार चरणी आहेत.

( ४ ) मुंबईमधील एका छापखान्यात एका समश्लोकी गीताटीकेची छापील पानें पडून आहेत. तिच्यामधील ओव्या बहुतेक चार चरणी असून भाषा अर्वाचीन आहे. कांहीं अध्यायांच्या शेवटीं ' निवृत्तिदेव विरचितायां ' असें म्हटलें आहे. ग्रंथाची सुरुवात " धृतराष्ट्र म्हणे संजया धर्मक्षेत्री यया । कौरवपांडव मिळोनिया । तेथ काय करिताती ॥ १ ॥ संजयो म्हणे गा राया । पांडवसैन्य दृढ देखोनिया । दुर्योधनु द्रोणाचार्या । सांगता जाहला ॥ २ ॥ " अशी आहे.

( ५ ) हैद्राबाद येथें उस्मानाबाद विद्यापीठांत एक निवृत्तिदेवी होती असें समजलें. परंतु तिच्याबद्दल कांहीं माहिती मिळूं शकली नाहीं.

( ६ ) अकोल्याचे प्राध्यापक श्री. म. रा. जोशी यांचेकडील निवृत्तिकृत गीताटीका शक १७५८ मध्यें रेणुका क्षेत्रापासून दोन कोस असलेल्या बदरी ग्रामी नकललेली आहे. ती व वरील (४) मधील टीका यांत फार थोडा फरक दिसतो व दोन्ही जवळ जवळ एकच आहेत. शेवटचे जादा श्लोक व मधील एकादे दुसरे जादा श्लोक सोडल्यास ही समश्लोकी आहे. हिच्या प्रारंभींच्या ओव्या–" धृतराष्ट्र म्हणे संजया । धर्मक्षेत्रकुरुक्षेत्र ठाया । कौरवपांडव मिळोनिया । तेथे काय करिती ॥१॥ संजय म्हणे रायांसि । पांडवसैन्य देखिले परियेसि । राजा दुर्योधन द्रोणाचार्यासी । जाउनि सांगता जाला। ॥२॥ " या असून पहिल्या अध्यायाच्या शेवटीं (४) मध्यें नसलेली ओवी " युद्ध न करी म्हणे अर्जुन । त्यासि संबोधना प्रबोध करी श्रीकृष्ण । द्वितीयोध्याई निरोपण । ऐका म्हणे निवृत्तिराज ॥४९॥ " ही निवृत्तिनाथांचें नांव असलेली ओवी येते. अठराव्या अध्यायाच्या शेवटल्या श्लोकानंतर खालील अधिक ओव्या शेवटीं येतात–" अगाध परमात्मयाची करणी । सकळ शास्त्रमथन करोनी । गीता नवनीत काढोनी । धनंजयासी दिधले ॥१॥ तेणे किरटीस बोध जाला । परब्रह्म मिळणीस मिळाला । आणि सकळ लोका मार्ग सापडला । भवसागर तरावया ॥२॥ अर्जुना जाले समाधान । भगवंत कृपेकरुण । गेले अज्ञान अधःपतन । दिव्य प्रकाश जाला ॥३॥ यालागी महानुभाव महाऋषी । तत्पर गीता अभ्यासी । तेणे पावले ते नेमेसि। अविनाशपद ॥४॥ ऐसा कृपाळु देवाधिदेव । जगी तारावया केला गीताभाव । कल्पांतीचा गर्वभाव । पुनरावृत्ति नाहि तया ॥५॥ "

( ७ ) ज्ञानेश्वरकालीं एक महानुभावीय यक्षदेव अथवा निवृत्तिदेव होऊन गेले. त्यांनीं शक १२२४ मध्यें गीतीटीका लिहिली. तिच्याबद्दल सविस्तर माहिती अद्याप प्राप्त झाली नाही.

वरील सर्व गीताटीकांचें स्वरूप पाहातां त्यांपैकीं कुठलीच ज्ञानेश्वरबंधू निवृत्तिनाथ यांची नाही हें उघड दिसतें. ज्ञानेश्वरीसारखा ग्रंथ प्रवृत्त करणारे निवृत्तिनाथ स्वतः कनिष्ठ दर्जाची गीताटीका लिहितील हें असंभवनीय वाटतें. ज्ञानेश्वरींत " तीरे संस्कृताचीं गहनें । तोडूनि मऱ्हाटिया केली शब्दसोपानें । रचिली धर्मनिधानें निवृत्तिदेवें " १२।९. या ओवीचा निवृत्तिनाथांनीं ज्ञानेश्वरांकडून करविली असा अर्थ लावला जातो. व मागीलपुढील ओव्यांवरून तोच अर्थ सयुक्तिक आहे. इ. स. १४०० च्या सुमारास महानुभावीय चाल्हणशिष्य नृसिंहाच्या संकेतगीतेंत ज्ञानेश्वर, निवृत्तिनाथ, सोपानदेव यांचा कवि म्हणून उल्लेख आढळतो. एकनाथांनींहि भागवताच्या पहिल्या अध्यायांत निवृत्ति-नाथांचा कवीश्वर म्हणून उल्लेख केला आहे. त्यामुळें निवृत्तिनाथांनीं कांहीं ग्रंथरचना केली होती कीं काय असा प्रश्न उद्भवतो. मात्र प्रस्तुत संकेतगीता संशोधनपूर्वक छापली गेली नाहीं व तिची छापलेली प्रत पाहतां तिच्यात कांहीं अध्यायांनंतर भाषा बदलून समश्लोकी होते. यामुळें तिच्याबद्दल संशय उत्पन्न होतो. निवृत्तिनाथांनीं कांहीं रचना केली असेलहि; परंतु सध्या तरी त्यांची निश्चितपणे म्हणतां येईल अशी रचना उपलब्ध नाहीं व निवृत्तेश्वरी या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या गीताटीका अर्वाचीन कवींच्या आहेत. तंजावर येथील हुसेन अंबरींत निवृत्तिनाथाच्या गीताटीकेचा जो उल्लेख आहे तो अशाच अर्वाचीन गीताटीकेचा उल्लेख असावा. कदाचित् तो उल्लेख वरील (३) प्रतीचाच असेल.

---

# १२. पेशवेकालीन एक सांकेतिक लिपी.

( मेजर ना. ब. गद्रे, पुणें )

इ. १९३२ सालीं पेशवे दप्तरांतील निवडक साधनांचा २२ वा खंड प्रसिद्ध झाला, त्यांत आरंभीं व पृ. १५५ वर इ. १८०९ सालची एका सांकेतिक लिपींतील नोंद श्री. सरदेसाई यांनीं छायाचित्रासह उद्धृत केली आहे त्यामुळें तशाच इतर नोंदी शोधण्याचा व त्या लिपीचा संकेत उलगडण्याचाहि प्रयत्न प्रस्तुत लेखकानें इ. १९५० मध्यें केला होता. त्यासाठीं इ. १८०५ ते १८०७ दरम्यानच्या व दुसरा बाजीराव यांचे खाजगी खर्चांत खिजमतगार त्रिंबकजी डेंगळे याचे मार्फत झालेल्या सुमारें वीस नोंदी नकलून त्यांचा तक्ता बनविला; त्यांत साम्यवैषम्य शोधून लिपिसंकेत उलगडण्याचा व अर्थ लावण्याचा प्रयत्न केला. पण यश आलें नाहीं.

इ. १९६७ जुलै-ऑगस्ट मध्यें तोच धागा पुन्हा पकडून काम चालू केलें. इ. १८०७ ते १८१० च्या आणखीहि पांच खर्चनोंदी सांपडल्या. इ. १८१० तील खर्च खिजमतगार यशवंतराव मैराळ याचे मार्फत झाला आहे. मात्र कोणताच लिपिसंकेत अद्याप उलगडला नाहीं. वार्षिक सुमारें पंचवीस लाखांचे जमाखर्चांत दरसाल दीडदोन

लाख रुपये गडप करणारा हा सांकेतिक खर्च उलगडला तर कांहीं इतिहासवस्तु नक्की हातीं लागेलसें वाटतें.

नुकतीच एक नवीन गोष्ट कळली. श्री. सरदेसाई यांनीं निवडलेल्या खास कागदांत रुमाल एस. आर. ५९ मध्यें 'दुर्बोध लिपींतील पत्रें' या मथळ्याचें सुमारें ५० बंद असलेलें पुडकें आहें. त्यांत अशाच एका सांकेतिक लिपीतील इ. १७९० च्या सुमाराचीं सवाई माधवरावाचे कारकिर्दीतील पत्रें आहेत. खालील संकेतानें उपरिनिर्दिष्टांपैकीं पुष्कळच पत्रांची फोड होते. मात्र वर दर्शविलेल्या दुसऱ्या बाजीरावांचे खर्चनोंदीस तो संकेत लागू पडत नाहीं.

हा संकेत असा :—

| मूळ | अ | क | ख | ग | घ | ङ | च | छ | ज | झ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| सांकेतिक | क | अ | छ | ज | झ | ङ | ट | ख | ग | घ |
| मूळ | ञ | ट | ठ | ड | ढ | ण | त | थ | द | ध |
| सांकेतिक | ञ | च | त | थ | द | ध | ठ | ड | ढ | ण |
| मूळ | न | प | फ | ब | भ | म | य | र | ल | व |
| सांकेतिक | भ | म | य | र | न | प | फ | ब | स | ह |
| मूळ | श | ष | स | ह | ळ | क्ष | ज्ञ | | | |
| सांकेतिक | ळ | क्ष | ल | व | श | ष | ज्ञ | | | |

वरील संकेत थोडक्यात असाही देता येईल.

'अ' ची बाराखडी कल्पलेली आहे.

अ खगघच ठडढण नपफब लवशष

क छजझट तथदध भमयर सहळक्ष

ङ, ञ, ज्ञ बदलत नाहींत. वरच्या अक्षरांचीं खालील किंवा खालील अक्षरांचीं वरील हीं एकमेकांचीं मूळें वा सांकेतिकें आहेत.

खालीं हा संकेत लागू पडणारें पेशवे दप्तरांतील एक अप्रसिद्ध पत्र व त्याखालीं त्याची फोड दिली आहे.

॥ श्री ॥

| **श्रीबाप** | **हिज्ञासभा** | **गंरुलबेट** | **पापसठीटा** | **म्बआब** |
|---|---|---|---|---|
| श्रीराम | विज्ञापना | जेंवुसरचे | मामलतीचा | प्रकार |
| **ठवी** | **गपीठावापणे** | **हाअथे** | **याव** | **व्फापुशे** |
| तरी | जमीदारामधे | वाकडे | फार | ह्यामुळे |
| **फेअ** | **मैळफाटी** | **ठयाहठ** | **असिफाल** | **ठअबीब** |
| येक | पैश्याची | तफावत | केलियास | तकरीर |
| **वोईल** | **लासपगउबी** | **फाधी** | **गपीढाबाटी** | **पात्ब** |
| होईल | सालमजकुरी | याणी | जमिदाराची | मात्र |
| **बुगुहाठ** | **असी** | **ठअबीब** | **अबधाटे** | **प्वधधे** |
| रुजुवात | केली | तकरीर | करणाचे | म्हणणे |
| **ई** | **भावोमंठाल** | **आदाहे** | **प्वधगे** | **ह्फागलंरणी** |
| कीं | नारोपंतास | काढावे | म्हणजे | व्याजसंबधी |
| **बुगुहाठ** | **वोईस** | **फाटे** | **प्वधधे** | **ई** |
| रुजुवात | होईल | याचे | म्हणणे | कीं |
| **भावोमंटी** | **लर्ह** | **फेअ** | **मैळफाटे** | **काठव** |
| नारोपंती | सर्व | येक | पैश्याचे | आतर |
| **तेहिसे** | **भावी** | **ठी** | **फाढ** | **ओधाल** |
| ठेविले | नाही | ती | याद | कोणास |
| **ढाछाहीठ** | **भावी** | **ढुशळीळेच** | **लाय** | **रोसठो** |
| दाखवीत | नाही | तुळशीशेट | साफ | बोलतो |
| **ई** | **फाढ** | **काप्वाल** | **ढुद्वाल** | **कंठबट** |
| कीं | याद | आम्हास | तुम्हास | अंतरच |
| **अबाहफाटे** | **भलिस्फाल** | **फाढ** | **ढाछहाही** | **प्वधगे** |
| करावयाचे | नसिल्यास | याद | दाखवावी | म्हणजे |
| **कंठब** | **तेहिसे** | **कावे** | **भावी** | **लपगेस** |
| अंतर | ठेविले | आहे | नाही | समजेल |
| **वे** | **जोक्ष्व** | **ठबी** | **वे** | **अबीठ** |
| हे · | गोष्ट | तरी | हे | करीत |
| **भावी** | **दुशळीळेच** | **काप्वामाली** | **फेहुभ** | **लर्ह** |
| नाही | तुळशीशेट | आम्हापासी | येवून | सर्व |

| नाक्षणे | ठअबीबभीलमधाटी | | लिरढीटे | हजैब |
|---|---|---|---|---|
| भाषणे | तकारीरनीसपणाची | | सिब्रंदीचे | वगैरे |
| छर्टहेट | लुणा | काप्वाल | हाअयजावी | कावे |
| खर्चवेच | सुधा | आम्हास | वाकफगारी | आहे |
| ढुप्वी | कंठलठाटी | फादी | मावूभ | ढ्फाठील |
| तुम्ही | अंतस्ताची | यादी | पाहून | त्यातील |
| असपे | पगसा | लाजाही | प्वधगे | कंठब |
| कलमे | मजला | सागावी | म्हणजे | अंतर |
| कावे | ढुप्वाल | म्त्रह्फफाल | काधूभ | ढेठो |
| आहे | तुम्हास | प्रत्ययास | आणून | देतो |
| काप्वाल | फादी | फाधी | ढाछाहिसी | वी |
| आम्हास | यादी | याणी | दाखविली | ही |
| मावा | कैले | पुछाभे | पाह्त्र | प्वधठाठ |
| पाहा | ऐसें | मुखाने | मात्र | म्हणतात |
| काप्वी | एहश | लंळफ | शेहूभ | फाढ |
| आम्ही | केवळ | संशय | घेवून | याद |
| ढाछहा | प्वधाहे | ठवी | फाल | हाकीचं |
| दाखवा | म्हणावे | तरी | यास | वाईट |
| हाचधाव | लासपगअबी | वबफेअ | भिपिह्फ | सावठ |
| वाटणार | सालमजकरी | हरयेक | निसित्य | पाहत |
| कावेठ | फागअबिठा | आवी | फेअ | रोसंठा |
| आहेत | याजकरिता | काही | येक | बोलता |
| फेठ | भावी | भावोसंठ | आदाहफारढास | ठीभ |
| येत | नाही | नारोपंत | कादावयाबदल | तीन |
| वगाब | व्रुमफे | झ्फाहे | कैलेवी | ढुशळेच्च |
| हजार | रुपये | घ्यावे | ऐसेही | तुळशेट |
| रोसठो | मवंढु | वे | कैअठ | भावी |
| बोलतो | परंतु | हे | ऐकत | नाही |
| ढीआधाल | कनीपाभ | हीळेश | मथीसा | कावे |
| दीवाणास | अभिमान | वीशेष | पडिला | आहे |

# १३ शहाजी व शिवाजी यांच्या बिकानेर येथील जन्मपत्रिका

(म. म. द. वा. पोतदार, प्रा. ग. ह. खरे, श्री. गो. त्र्यं. कुलकर्णी, पुणें)

(१) शिवजन्मतिथीचा वाद इ. स. १९२५ ते १९३० च्या दरम्यान फार मोठ्या प्रमाणांत चालून नंतर तो थंड पडला. हळूहळू नवी शिवजन्मतिथि लोकांत मान्य होऊं लागली होती व जुन्या तिथीचे प्रवादक अस्तंगत होऊं लागले होते. परंतु महाराष्ट्र सरकारनें शिवजन्मतिथीच्या निश्चयासाठीं एक समिती नेमल्यानें त्या वादास पुनः एकदां चालना मिळाली. त्या समितीचा वृतांत अजून प्रसिद्ध व्हावयाचा आहे. एवढ्यांत श्री. पगडींनीं मुरारेस्तृतीयः पंथाः या वाक्प्रचारास अनुसरून एक तिसरीच तिथि लोकांपुढें मांडण्याचा प्रयत्न केला. यामुळें नवतिथिवाद्यांना आपल्या पुराव्यांची परिस्थिति पुनः एकदां अवलोकन करावी असें वाटलें. आमच्या जन्मपत्रिकांच्या पुराव्यांपैकीं एक बिकानेरला आहे हें सर्वज्ञात होतें. पण तिचें प्रथम प्रकटीकरण डॉ. दशरथशर्मा यांनीं इ. १९३४ मध्यें इंग्रजींत केल्यावर लागलीच प्रा. खरे यांनीं त्याचा मराठी अनुवाद केसरीमध्यें प्रकाशित केला (१९३५ मार्च ५). पण त्या पत्रिकेचा मूळ पाठ आम्हांपैकीं कोणापाशींही नव्हता. तसेंच ती पत्रिका बिकानेरला कोणापाशीं आहे याचाही आम्ही कोणी शोध घेतला नव्हता. भारतीय इतिहास परिषदेच्या पतियाळा अधिवेशनाला जाण्याच्या निमित्तानें प्रा. ग. ह. खरे, श्री. गो. त्र्यं. कुलकर्णी व आमचे मित्र श्री. देवीसिंग चौहान अशा तिघांनीं सितामऊ येथील डॉ. रघुबीरसिंह यांजकडील फार्सी अखबारांचा संग्रह तपासून आवश्यक ते उतारे घेण्यांत पाच दिवस घालविले आणि पतियाळा अधिवेशन संपल्यावर म. म. पोतदार, प्रा. खरे व श्री. कुळकर्णी असे तिघे बिकानेरला गेलों. तेथें मुख्य कामाबरोबर जन्मपत्रिकेचाहि शोध घेतला. हा शोध घेत असतां देवदैत्यांच्या समुद्रमंथनांत अमृताबरोबर लक्ष्मीसारख्या इतर रत्नांचाहि लाभ झाला त्याप्रमाणें शिवाजी महाराजांच्या जन्मपत्रिकेबरोबर शहाजीच्या जन्मपत्रिकेचाही लाभ झाला. या लाभाचेंच येथें वर्णन करावयाचें आहे. पण हें करण्यापूर्वीं शहाजीच्या जन्मदिनाची तर सोडाच पण जन्मवर्षाचीहि किती व कशी अनिश्चिति होती हें येथें थोडक्यांत दाखवितों.

(२) कै. राजवाडे शहाजीचा जन्म श. १५१६ मध्यें झाला असें मानतात. (राधामाधवविलासचंपू प्रस्तावना पृ. ४१). कै. रा. ब. दरदेसाई यांनीं आपल्या रियासतीच्या शहाजी या पहिल्या भागांत शेडगांवकर बखरीच्या आधारानें श. १५१६ जय संवत्सर चैत्र शुद्ध ५ (इ. १५९४ मार्च १८) असा जन्मकाल दिला आहे (पृ. २०). व त्याचाच थोडा निराळा पुनरुच्चार त्यांनीं आपल्या न्यू हिस्ट्री

ऑफ दि मराठाजमध्यें केला आहे ( खंड १, पृ. ४१ ). पण मूळ शेडगावकर व सप्तप्रकरणात्मक चरित्र या बखरी पाहतां त्यांत श. १५१६ जय संवत्सर येवढाच तपशील दिला आहे ( पृ. ८, प्रा. भीमराव कुलकर्णी संपादित प्रत पृ. १२ ). चैत्र शुद्ध ५ हा तपशील शिवदिग्विजय बखरीवरून घेतलेला दिसतो. तथापि त्या बखरींत इंदुवार दिला आहे तो चैत्र शुक्ल ५ शीं जुळत नाहीं म्हणून तो टाकून दिला ( पृ. ३७ ). कै. द. वि. आपटे यांनीं शिवचरित्रनिबंधावलींत श. १५२४ ( इ. १६०२ ) मध्यें शहाजीचा जन्म झाला असावा असें अनुमान केलें आहे ( पृ. १५ ). कै. सरकारांनीं शहाजीचें जन्म–वर्ष–मास–दिन यांपैकीं कांहींच दिलें नाहीं. पण ते आपल्या 'हाउस ऑफ शिवाजी' मध्यें मलिकंबर इ. १६२६ मध्यें मेला तेव्हां शहाजी सुमारें ३१ वर्षांचा होता असें विधान करतात ( तिसरी आवृत्ती पृ. २७ ). तेव्हां त्यांच्या मतें शहाजी सुमारें इ. १५९६ मध्यें जन्मला असें ठरतें. कै. डॉ. बाळकृष्ण शहाजीचा जन्म इ. १६०२ मध्यें झाला असें समजतात ( शिवाजी दि ग्रेट, खंड १, भाग १, पृ. ५५ ). श्री. बेंद्रे आपल्या मालोजी राजे आणि शहाजी महाराज या पुस्तकांत शहाजी इ. १६०१ मध्यें जन्मला असावा असें अनुमान करतात ( पृ. १४७, १४८ ). तात्पर्य, भक्कम पुरावा मिळत नसल्यानें शहाजीचा जन्म विविध विद्वानांनीं श. १५१६ व श. १५२४ यांच्या दरम्यान झाल्याचें अनुमानलें आहे.

( ३ ) बिकानेर येथील अनूप हस्तलिखितग्रंथालय, त्यांत असलेल्या दुर्मिळ हस्तलिखित संग्रहाबद्दल जगप्रसिद्ध आहे. तेथें राधामाधवविलासचंपू, राजाभिषेक इ. मराठी इतिहासाला उपयुक्त हस्तलिखितें आहेत हें सर्व गंभीर अभ्यासकांस माहीत होतें. तेथील हस्तलिखितांच्या बृहत्सूचीहि प्रकाशित झाल्या आहेत. त्यांपैकीं राजस्थानी हस्तलिखितांच्या सूचींत जन्मपत्रिकांचे २ संग्रह नोंदले आहेत. पैकीं क्र. २३७१२ या संग्रहाची वही साधारणतः पाच इंच लांब, चार इंच रुंद आहे. या वहींत ७७ पानें म्हणजे १५४ पृष्ठें आहेत. प्रत्येक पृष्ठावर एक याप्रमाणें हींत १५४ जन्मपत्रिका आहेत. मुळांत हीं पानें अंशतः सुटीं असावीं. पण तीं जीर्ण होऊं लागल्यानें त्यांना साधारण पारदर्शक कागद चिटकवून त्यांची वही बांधली आहे. तरीही तीमधील कांहीं पानें फाटलीं आहेत. वहीच्या दहाव्या पानाच्या पोटावर शिवाजीची व पाठीवर शहाजीची जन्मपत्रिका आहे. प्रत्येक जन्मपत्रिकेचे दोन भाग आहेत. पहिल्या भागांत २ ते ४ ओळींत विशिष्ट मनुष्याच्या जन्मसमयाचा उणाअधिक तपशील दिला असून त्याखालीं तदनुसार बनणाऱ्या दोन कुंडल्या समोरासमोर दिल्या आहेत. पैकीं डावी-कडच्या लग्नकुंडलींत ग्रह मांडले असून उजवीकडच्या भावकुंडलींत बारा स्थानें दाखविलीं आहेत. पण कोणत्याही भावकुंडलींत ग्रह मांडलेले नाहींत. या संग्रहांत सर्वांत जुनी जन्मपत्रिका पृथ्वीराज चौहानाची असून सर्वांत अलीकडची संवत् १७१९ ची आहे. तेव्हां ही वही सं. १७१९ नंतर लवकरच बांधली गेली असें समजण्यास हरकत नाहीं. ही वही बिकानेरला तयार झाली असल्यामुळें बिकानेरच्या राजांपैकीं

कांहींच्या, तसेंच बिकानेरची वसणूक, तद्वत् बिकानेर किल्ल्याचा सूत्रपात ( आखणी ), खात ( खुदाई ), शिलान्यास व संपूर्णता यांच्याही पत्रिका या संग्रहांत आल्या आहेत. पण यांत दारा, मुराद, खुस्रव, शहरियार, पर्वीझ, इत्यादि मुघल राजपुरुष आणि जाफरखान, खानझमान, शायिस्तेखान इत्यादि मुघल सरदारांच्याही जन्मपत्रिका आहेत हें या वहीचें वैशिष्ट्य आहे. शहाजीच्या कुंडलीसह जन्मपत्रिकेचा पाठ असा--

( १ ) संवत् १६५५ वर्षे फाल्गुन कृष्ण १४ गुरौ रात्रिगतघ
( २ ) टी २७ पल ४७ समये मीनलग्नमध्ये शाहजीराज
( ३ ) जन्मः

लग्न




भाव 8।।




( ४ ) पिल्ले जंत्रीप्रमाणें संवत् १६५५ (श. १५२०, इ. १५९९) मधील अमांत फाल्गुन वद्य १३, गुरुवारीं २८ घटका १२ पळें असून नंतर चतुर्दशी लागत आहे. शहाजीचा जन्म रात्रीचा २७ घटका ४७ पळें एवढा समय गेल्यावर झाल्यामुळें तेव्हां चतुर्दशी निश्चयानें होती. जन्म पहाटेच्या वेळीं किंवा उजाडत्या शुक्रवारीं झाला असल्यानें त्या वेळीं मीन लग्न असण्यास कांहींच हरकत नाहीं. पण वाराचा हिशेब एका सूर्योदयापासून दुसऱ्या सूर्योदयापर्यंत करीत असल्यानें जन्मसमयीं वार गुरुवारच धरला पाहिजे. या योगाची इंग्रजी तारीख इ. १५९९ मार्च ३० ही येते.

( ५ ) ही जन्मपत्रिका शिवाजीचा बाप शहाजी याचीच कशावरून असा आक्षेप काढल्यास त्यास उत्तर येवढेंच कीं, राजपूत राजपुरुषांत शहाजी असें नांव सहसा येत नाहीं व शिवाय ही पत्रिका शिवाजीच्या जन्मपत्रिकेच्या पाठीवर असल्यानें ती शहाजीचीच आहे याविषयीं शंका रहात नाहीं.

( ६ ) या जन्मपत्रिकेच्या संगतीनें शिवाजीच्या जन्मपत्रिकेचा पाठहि देऊन ठेवतों.

( १ ) संवत् १६६६* वर्षे फाल्गुन वदि ३ भृगौ रात्रिगत घटी
( २ ) १ पल १ समये सिंहलग्नमध्ये शिवाजीरा ज* जन्मः

---

* या संख्येपैकीं शेवटचे दोन सहाचे आकडे जुन्या पोथ्यांत अनुसरलेल्या पद्धती-प्रमाणें बारीक रेषांनीं खोडले असून थेट त्यांच्या माथ्यांवर लहान आकाराचे पण त्याच शाईत ८ व ६ हे आकडे घातले आहेत. जच्या माथ्यावरही एक उभी रेषा मारून तें अक्षर खोडल्याचें दाखविलें आहे. लग्नकुंडलींत कर्णांच्या छेदबिंदूवर श्री हें अक्षर लिहिलें आहे.

लग्न




भाव ४।।




( ७ ) या संशोधनाच्या निमित्तानें दोन गोष्टी लक्षांत येतात. एक म्हणजे राजस्थानांत आणखी दोन तीन पत्रिकासंग्रह उपलब्ध असल्याचें आज ज्ञात आहे. तेव्हां त्यांत आणखी कोंणा मराठी राजपुरुषांच्या जन्मपत्रिका आहेत कीं काय हें पाहिलें पाहिजे. आणि दुसरें म्हणजे मराठी इतिहासाचें संशोधन आम्ही महाराष्ट्रीयांनीं केलें तरच तें अधिक फलदायी होईल. येथेंच पहा ना. डॉ. दशरथशर्मा यांना अपूर्वाई वाटली म्हणून त्यांनीं शिवाजीची जन्मपत्रिका प्रकाशित केली. पण त्यांचें लक्ष शहाजीच्या जन्मपत्रिकेकडे गेलें नाहीं. आमच्या इतिहासाची आमच्या इतकी आस्था इतरांनाही असली पाहिजे अशी अपेक्षा करणेंच चूक आहे. आमच्या इतिहासाचें संशोधन आम्हीच केलें पाहिजे.

---

## 14 Marathi Contents of This Issue

(1) Bhide V. V.: A commentary on the Dve Virūpe hymn. Here the editor gives information about the author and his commentary on the above hymn from the Śākala recention of Ṛgveda. The author tries to interpret the hymn as addrssed to Nṛsiṁha the 4th incarnation of Viṣṇu, who is not accepted as a Vedic god by Vedists.

(2) Rendition of Chaul (in English).

(3) Shri. Bahirat B. P.: A new MS of Jñāneśvarī, with 874 additional *ov.s*. This copy of the MS, although not more than 150 years old, does not seem to have its origin in the version of Jñāneśvarī as revised by Ekanātha. It was found at Viṭe (dist. Satara).

(4) Dr. Kelkar K. S.: Influence of Marathi on Kabīra. The writer points out on the basis of some illustrations from Kabīragranthāvalī, that the natural flow of the language of Kabīra contained not a few traces of Marathi and opines that his language was a sort of integrated Hindi.

(5) Dr. Harshe R. G.: Versified life of Jñāneśvara by a poet-saint Tukā Vipra. The writer reproduces the text of 250 verses with critical annotation at the end, stating in places how his account differs from the conventional one.

(6) Dr. Parkhe V. V.: Pṛcchāpatra: an unpublished composition of Ajñānasidha. The writer reproduces the full text of the composition with a few introductory remarks regarding the poet. According to him the poet lived in the 14th century and the subject of his composition is a dialogue on Vedanta.

(7) Shri. Nagarkar R. S.: The poet Datta, hitherto unknown poet of the Rāmadāsi sect. The writer gives information about the poet, who lived towards the end of the 18th century. He was a disciple of Viṭṭhaladāsa who on his part was the disciple of Rāmad-sa. The language is simple and full of devotional pathos.

(8) Dr. Mundi B. N.: Baṅkata Taraṅgiṇī of Śivarāma. The writer acquaints the reader with 'Baṇkata Taraṅgiṇī', a versified devotional composition of Śivarāma completed by him in Śaka 1705. The work is an abridged rendering of the Sanskrit *Varāha Purāṇa.* He further traces the tradition of Śivarāma and draws attention to the similarity of the writings with two other poet-saints.

(9) Shri. Joshi N. K.: An incomplete version of Bhāūsāhebāñcī Bakhara?: a new MS seemingly the origin of the well-known Bhāūsāhebāñcī Bakhar was in the possession of Shri. Hinge of Tasgaon (dist. Sangli). The same was acquired through the good offices of Dr. V. V. Athalye of Satara. The MS seems to be an abridged narration of most of the incidents in the famous bakhar. With a few exceptions even some words and phrases are similar. Perhaps only a complete copy of the MS if and when available would enable a student to conclude whether Bhāūsāhebāñcī Bakhar is really an enlarged version of this composition or not.

(10) Dr. Kulkarni A. R.: Grant Duff's Satara Residentship 1818-22. The writer elaborates how Capt. James Grant Duff ably served his master Elphinstone during the critical transitional period, introducing British administration in Satara, while always behaving tactfully with the Rājā Pratāpasiṁha. He also describes how sincere and painstaking he was in collecting reliable information for his famous 'History of the Mahrattas'. The writer has profusely supported his statements, quoting original documents.

(11) Shri Deshpande J. S.: Miscellaneous writings and works of Nivṛttinātha—The writer examines a number of compositions (both in MS and printed forms) associated with the name of Nivṛttinātha as the author and concludes that their authorship could not be associated with Nivṛttinātha, the brother of Jñāneśvara.

(12) Major Gadre N. B.: Code writing of the Peshwa period. Peshwa Daftar Vol. 22 p. 155 gives a statement of accounts for the year 1809 written in a code language. The writer has gone through many similar statements, but he had not been able to decipher them. He has however found out a code which is useful for a set of other letters. A specimen of such a writing is given here.

(13) M. M. D. V. Potdar, Prof. G. H. Khare and Shri G. T. Kulkarni: Birth-dates and horoscopes of Shahājī and Shivājī the Great. Here the authors bring to light for the first time the birth-date and horoscope of Shahājī, the former of which was disputable as that given by *bakhars* is irregular. They also reproduce the text of the details of the birth-date and horoscope of Shivājī, the Great, which was already known.

( ३ ) या मंडळावर वरील टीका करतांना टीकाकारांनीं ती करण्यापूर्वी प्रथम पुढील मुद्द्यांचा विचार करावयास पाहिजे होता. (१) आपण मंडळास कांहीं साह्य करतो कां ? ( २ ) करीत असल्यास किती करतो ? (३) इतर लोक, सरकारें, नगरपालिका, जिल्हा परिषदा, कांहीं प्रदान करूं शकणाऱ्या विद्यापीठासारख्या संस्था यांजकडून कितपत साह्य मिळतें ? ( ४ ) संस्थेचें ध्येय काय व तिच्या गरजा कोणत्या ? ( ५ ) तदनुसार उचित योग्यतेचीं व संख्येचीं माणसें नेमावयाचीं तर त्यासाठीं द्रव्यसाह्य किती लागेल ? ( ६ ) आज मिळणारें द्रव्यसाह्य तेवढें आहे कां ? अशा प्रकारच्या सर्व मुद्द्यांचा आत्मौपम्य भावनेनें तुलनात्मक माहिती समोर ठेवून विचार केला तर या तिघांनींही संस्थेवर अवास्तव टीका करून विलक्षण मोठा अन्याय केला आहे असें मान्य करावें लागेल. असें करणारास ज्ञानेश्वरांनीं अतिशय मार्मिक उत्तर दिलें आहे. ते म्हणतात ' जैसा कोणी एक कांजी पियाला—, आणि परिणाम पाहों लागला अमृताचा. समाज या संस्थेस कांजी प्यायला देतो आणि या संस्थेवर अमृत प्याल्याचा परिणाम कां होत नाहीं हें विचारीत आहे. टीकाकारांनीं वस्तुस्थिति लक्षांत घेऊन, निदान मंडळ कार्यकर्त्यांशीं विचारविनिमय करून नंतर लिहावयास पाहिजे होतें असें वाटतें.

( ४ ) मंडळाची त्रैवार्षिक निवडणूक होऊन तीमध्यें शक १८८९ ते ९१ या सालांकरितां पुढील कार्यकारी मंडळ निवडून आलें.

(१) **कार्याध्यक्ष**– म. म द. वा. पोतदार; (२) **खजिनदार**– श्री. सरदार गं ना. मुजुमदार; (३,४,५,) चिटणीस–प्रा. ग. ह. खरे, डॉ. अ. रा कुळकर्णी, श्री. स. वि. जोशी; **साधारण सभासद**–(६) प्रा. न. र. फाटक, (७) श्री. वि. द. घाटे, (८) प्रा. रा. वि. ओतुरकर, (९) श्री. वि. रा फडके, (१०) श्री. म. द. भागवत, (११) श्री. वि. अ. पटवर्धन, (१२) आचार्य वि. प्र. लिमये, **स्वीकृत** : (१३) श्री. देवीसिंग चौहान, (१४) डॉ. पु. म जोशी.

(५ )या अंकांत द्वे विरूपे हें सूक्त प्रकाशित केलें आहे. त्याच्या अधिक प्रतींसाठीं श्री. ख. रा. विंचूरकर यांनीं दोनशे रुपये व श्री. गो. ह. दंडवते, साहित्याचार्य यांनीं अकरा रुपये दिले. या सूक्ताच्या स्वतंत्र प्रति काढून त्यांस स्वीय ग्रंथमालेचा ९९ हा क्रमांक दिला आहे. या सूक्ताची सटीक प्रतही श्री. दंडवते यांनींच उपलब्ध केली.

( ६ ) गेल्या अंकाप्रमाणें याहि अंकास महाराष्ट्र राज्य साहित्य व संस्कृति मंडळाकडून साह्य मिळणार आहे याबद्दल मंडळास संतोष वाटतो व हें मंडळ त्या मंडळाचें आभारी आहे.

श. १८८९ रथसप्तमी<br>
इ. १९६८ फेब्रुवारी ५

चिटणीस

# अनुक्रमणिका



---


**भारत इतिहास संशोधक मंडळ त्रैमासिकाची केंद्र सरकारच्या नियमानुसार द्यावयाची माहिती ( १९५६ चे नियम, नियम ८, नमुना ४ )**

| | |
|---|---|
| १ प्रकाशन स्थळ— | भा. इ. सं. मंडळ, १३२१ सदाशिव पेठ, पुणें २ |
| २ प्रकाशन काल— | त्रैमासिक |
| ३ मुद्रकाचें नांव राष्ट्रीयत्व व पत्ता | दत्तात्रेय वासुदेव आंबेकर, भारतीय, आर्यभूषण मुद्रणालय, ९१५/१ शिवाजीनगर, पुणें ४ |
| ४,५ प्रकाशक व साधारण संपादक यांचीं नांवें, राष्ट्रीयत्व व पत्ते | श्री. गणेश हरि खरे, डॉ. अनंत रामचंद्र कुळकर्णी, श्री. सदाशिव विश्वनाथ जोशी; भारतीय, १३२१ सदाशिव पेठ, पुणें २ |
| ६ मालक व पत्ता— | भा. इ. सं. मंडळ, १३२१ सदाशिव पेठ, पुणें २ |

आम्ही उपर्युक्त तिघे प्रकट करतों कीं, आमची माहिती व विश्वास यांप्रमाणें दिलेला तपशील अचूक आहे.

ता. ६।२।१९६८ **ग. ह. खरे, अ. रा. कुलकर्णी, स. वि. जोशी**